वन्दे मातरम्

# अिन्दु-विलास

भालेन्दु

यांच्या निवडक भावगीतांचा सङ्ग्रह


लेखक

भालचन्द्र सिताराम सुकथनकर,

अेम. अे. अेल्अेल्. बी.

सॉलिसिटर, हायकोर्ट, मुंबअी.

( कवि भालेन्दु )

लो. टिळकांच्या गीता-रहस्याचें अिंग्रजी भाषांतरकर्ते.


शारदामिन्दिरां चापि वन्दे ज्ञानधनाप्तये ।
भवन्तु तत्प्रसादेन सफला मे मनोरथाः ॥


प्रथमावृत्ति

सन १९३८.

प्रति १०००

| कागदी बाअिन्डिङ्ग | किंमत | कापडी बाअिन्डिङ्ग |
| --- | --- | --- |
| रुपया अेक | पोष्टेज निराळें | रुपया दीड |




झाली का ऋण-फेड पूर्ण वद, गे, आतां तरी स्वामिनी ?

जिच्या प्रीतीसाठीं रुचिर कवनें नित्य रचिलीं !
महायत्नें रत्नें जमवुनि सुवर्णांत खचिलीं !
जिची छाया वांया भुलवित जिवा या निशिदिनीं !
कुठें आतां कान्ता शिखरिदशना ती शिखरिणी ! ?

माधव-ज्यूलियन

# कवितांची अनुक्रमणिका


| कविता | पृष्ठ |
|---|---|
| वाचकांस | १ |
| एक कवि कवि कसा झाला | २ |
| **प्रेमगीतें** | |
| श्रम आणि फळ | ५ |
| प्रेम आणि मरण | ६ |
| अलभेस | ७ |
| शंका-निरसन | ८ |
| स्वदेश-सेविका | ९ |
| चित्त-चोर | १० |
| चित्तचोराचें उत्तर | ११ |
| स्वर्ग-पुष्प | १२ |
| दृढ-बन्धन | १३ |
| स्वर्गीय प्रेम | १४ |
| मधुर-हास्य | १६ |
| कविता कशास ? | १८ |
| फक्त प्रेमाची ओंवाळणी | २० |
| नूतन वर्षारम्भ | २२ |
| काय म्हणूं ? | २३ |
| भ्रम-निरसन | २४ |
| भग्नहृदयांतील करूणोद्गार ऐकून | २६ |
| विरह-वेदना | २७ |
| अभाग्याचें प्रतिमापूजन | २८ |
| मी आहेंच तुझा ! | २९ |
| मी नाहीं तुमची ? | ३० |
| प्रेम-मंदिर | ३१ |
| दोन पक्षी | ३२ |
| प्रतिबन्ध | ३३ |
| सवति-मत्सर | ३४ |
| कविता कशास ? (१) | ३५ |
| प्रेम-कलह | ३६ |
| निष्कलंक | ४० |
| वंचना | ४१ |
| तूं टाकलेंस तर | ४३ |
| सुलतेस | ४४ |
| तेव्हां आणि आतां | ४६ |
| अनास्था | ४८ |
| बंधनाच्या अलिकडे | ४९ |
| प्रेम आणि कर्तव्य | ५१ |
| सागरिकेस | ५२ |
| अटकेंत | ५३ |
| सुकलेलें सोनचाफ्याचें फूल | ५४ |
| अधम-सङ्गम | ५५ |
| परित्यक्त | ५७ |
| शृंखला | ५९ |
| त्याग | ६० |
| दैवाचा पराजय | ६१ |
| अखेरचें पूजन | ६२ |
| मृत्यूस | ६३ |

| कविता | पृष्ठ |
| --- | --- |
| **शोकगीतें** | |
| निराशा | ६७ |
| स्वप्नांतील संसार | ६९ |
| चांदणी | ७१ |
| स्त्री | ७२ |
| सुवर्ण | ७३ |
| प्राणेश्वरी ! वैरिणी ! ! | ७४ |
| भिकारी | ७५ |
| निराशा-डोह | ७६ |
| धडपड व्यर्थचि ही | ७८ |
| निराश प्रेम | ७९ |
| प्रेम-संन्यास | ८० |
| होऊं बालक मी तुझें | ८१ |
| देवाकडे भांडण | ८२ |
| मातेस ! | ८३ |
| आतां पुन्हा येइ का | ८४ |
| उषा-लोप | ८६ |
| शोक-पर्यवसान | ८७ |
| **वैराग्यगीतें** | |
| मूले कुठारः | ९१ |
| विनत पतिता दाखवि दिवा | ९२ |
| विजय | ९३ |
| आत्मसंयमन | ९४ |
| नश्वरता | ९५ |
| स्वार्थ | ९६ |
| माझें | ९७ |
| अलभेस | ९८ |
| कर्मफल | ९९ |
| मृत्यूस | १०० |
| दिवंगत भार्येस | १०२ |
| एका कवीची आत्महत्या | १०५ |

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | ११ | गवहि | गर्वहि |
| ५ | ११ | चिंतुनि | चिंतुनी |
| ८ | ३ | स्मरूनिया | स्मरुनियां |
| ९ | ९ | दश | देश |
| ,, | ११ | लाग | लागे |
| १४ | ७ | प्रमळ | प्रेमळ |
| १५ | १ | खरे | खरें |
| १५ | २ | ह्रदया | ह्रदयीं |
| | ८ | येई | येइ |
| १८ | ३ | काणा | कोणी |
| २२ | ७. | मन | मनें |
| २७ | ६ | सखि मुखीं | सखिमुखीं |
| | ९ | छायारुपें | छायारूपें |
| ३० | ११ | चोरूनी | चोरुनी |
| ३५ | १७ | तव | नव |
| ३९ | ५ | प्रेमपरीक्षा | प्रेमपरिक्षा |
| ४६ | ३ | जादू च | जादूच |
| ६० | ७ | | तूं |
| | १३ | येई | येइ |
| | १७ | वदति | वदती |
| ६१ | १४ | घुमत श्रवणिं | श्रवणिं घुमते |
| ६३ | १५ | तूंते | तूतें |
| ६७ | ७ | ज्योती | जोती |
| ७२ | ४ | कष्टाविती | कष्टवीती |
| ७४ | १४ | कां | का |

| पृष्ठ | पंक्ति | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ७६ | १६ | हा ही | हाही |
| | १९ | नम्र ही | नम्रही |
| ८० | १५ | वैराग्य मंत्रासी | वैराग्यमंत्रासी |
| ८२ | ७ | भान ही | भानही |
| | ७ | स्वार्थ ही | स्वार्थही |
| | ११ | निश्चिंत ही | निश्चिंतही |
| | १६ | न्यायी | न्यायि |
| ८३ | ११ | हरिणी | हरिणि |
| | ११ | सदा ही | सदाही |
| | १२ | कदा ही | कदाही |
| | १७ | स्वार्थ-लोभीं | स्वार्थलोभीं |
| ८७ | १२ | गंजिफांत | गंजिफ्यांत |
| ९८ | ९ | स्बभाव | स्वभाव |
| १०२ | १९ | जेंवी | जेवीं |

## प्रभावी वक्ते व प्रतिभाशाली तत्वज्ञ

# न्यायरत्न धुं. गो. विनोद

यांचा

# पुरस्कार

" पृथिव्याः समुद्रपर्यंतायाः एकराट् "

" विरूपाः संतो बहुधैकरूपाः "

—श्रुतौ

जीवनांतले विविध रस चोखंदळपणें चाखणें व चाखविणें हा साहित्यिकांचा सहजसिद्ध व्यवसाय.

रसग्रहणाला रसमूल वस्तूशीं तादात्म्य अनुभवावें लागतें. या तादात्म्यामुळें साहित्यिकाच्या व्यक्तित्त्वांत अर्थपूर्ण प्रतिक्रिया होतात, व त्या व्यक्तित्वाला एक प्रकारचें अपूर्व आधिक्य लाधतें. कांठोकाठ भरलेल्या पेल्यासारख्या त्या स्थितींत, स्फूर्तिरस भराभर उसळूं लागतो ( केशवसुत ); आणि तेव्हां " रसिकें अक्षरांचा " ( ज्ञानेश्वर ) सुंदर मेळव साहजिक सिद्ध होतो. रसमूल वस्तूशीं होणारें हें तादात्म्य ' सविकल्प ' ( केळकर ) असतें. रसप्रवाहांत आकंठमात्र अवगाहन करणाऱ्या साहित्यिकास स्वतःच्या तटस्थतेचीही जाणीव असतेच. **साक्षित्व व सामरस्य यांच्या चलत्केंद्रावर अधिष्ठित होऊन अनुभवाचें महत्त्वमापन करणें म्हणजे साहित्यनिर्मिति.** साहित्य हा शब्द अनेक सूक्ष्म अर्थच्छटांचा संग्राहक आहे. जीवनाच्या विस्ताराला

व विकासाला जें जें **साधनभूत** असेल तें सर्व **साहित्य.** या लक्षणांतील अतिव्याप्ति रहस्यप्रापक असल्यामुळें दूषणीय नाहीं.

प्रमाणबद्ध आविर्भाव म्हणजे **सौंदर्य.** अनवश्यक विषमता हेंच विसौंदर्य. मानवी जीवनाला, समत्वयोगाचा, खऱ्या सौंदर्याचा, साक्षात्कार करविणाऱ्या, कृत्रिम विषमतेचें हिडिस स्वरूप व्यक्तविणाऱ्या, व सहस्राक्षः सहस्रपाद समाजाला सदैव दृष्टिपूत व गतिमान् ठेवणाऱ्या, कलावंतांना व लेखकांनांच 'साहित्यिक' ही पदवी यथार्थतः लावतां येईल; त्यांचें जीवनकार्य हें समाजजीवनाच्या उत्कर्षाचें खरें "साहित्य" असतें. मात्र, **सामाजिक जीवनांतील कृत्रिम विषमता नष्ट करणें जितकें आवश्यक, तितकेंच कृत्रिम समता निष्पन्न करणें निरर्थक.** या सत्याचें आकलन कष्टसाध्य आहे, पण साहित्यिकानां तर तें अतीव आवश्यक आहे.

उत्कट **सहानुभाव** ( sympathetic experience ) उत्पन्न करण्याची शक्ति प्रतिभाजन्य कृतीलाच असते. मानसशास्त्रदृष्ट्या, सहानुभाव हा साम्यवादाला आवश्यक असा पूर्वप्रत्यय आहे. या दृष्टीनें प्रत्येक प्रतिभासंपन्न साहित्यिक, मानवी जीवनाला अभावितपणें साम्यनिष्ठ करीत असतो; कारण त्याची कलाकृति सहानुभावाची वृद्धि करते. गटेला हर्षोन्मत्त करणारा कालिदासाचा श्लोक, सहानुभावाचें निष्पादन करून अखिल मानवतेला संश्लिष्ट करतो—समन्वित करतो, व दूरान्वयानें साम्यवादाला परिपोषक ठरतो. व्यवसायी प्रचारकांपेक्षां सहानुभाव जागृत करणारे प्रतिभासंपन्न साम्यवादी लेखक यामुळेंच अधिक यशस्वी होतात. मॅक्झिम गॉर्की, बोरीस पेस्टरनॅक, मायाकौस्की यांचें कार्य प्रचारकांचीं कितीं सहस्रकें करूं शकतील? आधुनिक साम्ययुगाच्या पूर्वीचें सर्व प्रतिभाजन्य व सहानुभाव वृद्धिंगत करणारें वाङ्मय, मानसशास्त्रदृष्ट्या अतर्कितपणें साम्यवादाला पोषकच झालें आहे!

श्री. भालेंदूचें काव्य युगतेजाचा संग्रह करीत नाहीं; अतएव तें नवयुगाचें प्रातिनिधिक काव्य नव्हे. पण तें सत्काव्य असल्यामुळें सहानुभावक आहे व नवयुगधर्माला, न कळतां, पोषकच आहे. सहानुभाव वाढविणारी एक "सामान्यता" या काव्यांत आहे ! हें काव्य कळण्याला अवघड नाहीं; यांतील भावनांचीं व उत्प्रेक्षांचीं उत्तुंग शिखरें आकाशाचे पल्याड लपलेलीं नाहींत; यांतील त्यागरस केवळ हुतात्म्यांनाच भावेल इतका "तेज" नाहीं—भालेंदूच्या कवितेचें वैशिष्टय म्हणजे **सौम्यता.** इंदुविलासच आहे तो ! ! अर्थातच त्या काव्यप्रकाशाचे उल्लास ज्योत्स्नेसारखे शीतल व आल्हादक आहेत. जणूं काय, गंगा-जलाच्या सान्निध्यानेंच, भालेंदूच्या काव्यकिरणांना एक प्रकारची शुचिता, पवित्रता लाधली आहे. भालेंदूची प्रतिभा नखरेल नाहीं; तिच्यांत मादक आकर्षकता, प्रेक्षकाला घायाळ करणारी विदारक सौंदर्यसाधना ( ravishing make-up ) नाहीं. ती एकाद्या प्रौढ गृहलक्ष्मीप्रमाणें भारदस्त पण नर्मगर्भ आहे ! प्रसंगनिष्ठेनें ती बालिशही होऊं शकते. गोविंदाग्रजांची कल्पकता व बालकवीची सूचकता यांचें एक अतीव सौम्य पण रम्य मिश्रण भालेंदूच्या कवितेंत निष्पन्न होतें.

प्रस्तुत काव्यसंग्रहाची मांडण अत्यंत मार्मिक व उद्बोधक आहे. जणूं काय एकाद्या भावप्रधान कवीचें जीवनचरित्रच त्यांत अनु-क्रमानें रेखाटण्यांत आलें आहे. "कवीचा जन्म" व "कवीची आत्महत्त्या" हे दोन आद्यंत बिंदू; "चित्तचोराचें उत्तर," "फक्त प्रेमाची ओंवाळणी," "मी आहेंच तुझा" व "मी नाहीं तुमची ?" या चतुःस्तंभांवर जणूं काय कवीच्या जीवनांतलें "प्रेम-मंदिर" विलसत आहे. "दोन पक्षी", "तेव्हां आणि आतां", "बंधनांच्या अलीकडे," "दैवाचा पराजय," व "अखेरचें पूजन" या पंचपात्रांत, परिणत प्रेमजीवनांतले पंचविध रस अनुक्रमानें वाढले आहेत. नंतर,

"निराशा–डोह", "प्रेमसंन्यास", व "शोकपर्यवसान" या त्रिवेणींत, भग्न–जीवन प्रतिबिंबित झालें आहे. तदुत्तर, विरजामंत्र म्हणजे *वैराग्यगीतें; व शेवटीं 'आत्महत्त्या.' हा कवीचा जीवनेतिहास भालेंदूनें सहेतुक लिहिला नसून, विविध प्रसंगीं लिहिलेल्या स्वतःच्या कवितांचा तसा अनुक्रम मार्मिकतेनें बसविला आहे; व "अप्रस्तुतप्रशंसा" हा मम्मटानें वर्णिलेला अलंकार, स्वतःच्या कविताकन्येला चढविला आहे!

भालेंदूच्या काव्यांत प्रसादगुण कित्येक ठिकाणीं उत्कर्षाच्या पराकोटीला पोहोंचला आहे. शुष्क इंधनाला अग्नि ज्याप्रमाणें सहज आत्मसात् करतो, त्याप्रमाणें चित्त जेव्हां अर्थाचें सहज ग्रहण करूं शकतें, तेव्हां प्रसाद गुणाची प्रसिद्धि होते. "चित्तं व्याप्नोति यत्क्षिप्तं शुष्केन्धनमिवानलः। स प्रसादः समस्तेषु रसेषु, रचनासु च ॥" ( दर्पण, viii, 7–8 ). वर नामतः उल्लेखिलेल्या कवितांत अत्यंत प्रसन्न अशा अनेक पंक्ति आहेत. व्युत्पन्न व निरक्षर या दोघांनाहि एकसमयानें आंदोलित करण्याचें सामर्थ्य त्यांत आहे. नैसर्गिकी प्रतिभा, निर्मल बहुश्रुति, व दीर्घ अभ्यास यांचा संगम, भालेंदूच्या कवितेंत, सौम्य व मनोज्ञ तऱ्हेनें

---

* भालेंदूचा काव्यात्मा खरोखरीच वैराग्यशील व तत्वजिज्ञासु आहे. सुमारें चार वर्षांपूर्वीं गीतारहस्याचें अभ्यासपूर्वक इंग्रजी भाषांतर करीत असतांना भालेंदूनें आचार्यांच्या संन्यासयोगाविषयीं जिज्ञासापूर्वक मला केलेल्या पृच्छा त्यांचीं "वैराग्य-गीतें" वाचतांना माझ्या स्मृतिक्षेत्रांत आज पुन्हा अंकुरित होत आहेत. प्रतिभा स्वभावतः तत्वजिज्ञासु असल्यामुळें, प्रतिभासंपन्न कवि हा अल्पाधिक अंशानें तत्वज्ञ असतोच. श्रुति सांगतेः–" अंतः प्रविष्टं कर्तारमेतं । देवानाम् बंधुं निहितं गुहासु ॥ अमृतेन कॢप्तं यज्ञमेतं । चतुर्होतॄणामात्मानं कवयो निचिक्युः ॥ ". गूढ आत्मतत्वाचें अस्तित्व कवींनींच निश्चित केलें आहे. प्रस्तुत श्रुतिवाक्याचें ईमर्सननें जणूं काय भाषांतरच केलें आहेः–" Poetry is the perpetual endeavour to express the *spirit* of the thing ".

—धुं. गो. विनोद

उपलब्ध होतो. "नैसर्गिकी च प्रतिभा श्रुतं च बहु निर्मलम् । अमंदश्चाभियोगोऽस्याः कारणं काव्यसंपदः ॥" (दण्डि). भालेंदूची "style" रीति, (रीतिरात्मा काव्यस्य—वामन) सहज-सरळ आहे. रमणीयार्थप्रतिपादन अनेक ठिकाणीं झालें आहे. ("रमणीयार्थप्रतिपादकः शब्दः काव्यम्"—जगन्नाथ ). ध्वनि ( मम्मट ) व रस ( विश्वनाथ ) हे दोन काव्यविशेष तितक्या प्रकर्षानें या काव्यसंग्रहांत अवतीर्ण नाहींत.

भालेंदूच्या व माझ्या वैयक्तिक स्नेहबंधामुळें त्याच्या काव्यकृतीचें अपत्यभावानें लालन करणें हें माझें कर्तव्यच आहे. पण या लालनांत, कर्तव्यबुद्धीपेक्षां, त्या अपत्याची विशिष्ट आकर्षकताच अधिक कारणीभूत आहे हें नमूद करावयास मला विशेष आनंद वाटतो.

आतां भालेंदूनीं पृथ्विवृत्तांतील कांहीं कवितांत कांहीं ठिकाणीं, यतिभंगानें केलेल्या रूढिविच्छेदकवैशिष्टयाकडे वळूं. याबद्दल उल्लेख त्यांनीं आपल्या प्रस्तावनेंत केला आहे.

निर्वर्ग समाजस्थितीकडे पाऊलवाट पाडूं पहाणारें आजचें वाङ्मय कृत्रिम व बाह्य रूढींना महत्त्व देत नाहीं हें क्रमप्राप्तच आहे. बंधनांच्या पलीकडे डोकावणारें आजचें जीवन यतिभंगाला, नियमभंगाला अनुकूल नसेल तर तें नवल! यति म्हणजे उच्चारक्रियेंतील योग्य विश्रांतिस्थल. यतिभंगदोष म्हणजे अपूर्ण शब्दावर, शब्दाच्या अवयवावरच विश्रांति घेणें:—

**यतिर्जिव्हेष्टविश्रामस्थानं कविभिरुच्यते ।**
**सा विच्छेदविरामाद्यैः पदैर्वाच्या निजेच्छया ॥**

—छंदोमंजरी

*विधान (Thesis) *प्रतिधान (Antithesis) व *संधान

---

* मला वाटतें वरील तीन शब्द न्या. विनोद यांनीं मराठींत प्रथमच प्रविष्ट केले आहेत. ते किती योग्य व यथार्थ आहेत हें स्पष्टच आहे.—**भालेन्दु.**

( Synthesis ) या त्रिपदा गायत्रीनें सामाजिक जीवन विकसित होत असतें; आणि आजचे सामाजिक व साहित्यस्थ यतिभंग, उद्यांच्या अधिक व्यापक व संग्राहक निर्बंधांचें प्रसादचिन्ह असल्यामुळें, बलवती रूढीलादेखील यतिभंगांची इष्टापत्ति आदरणीय वाटण्यास हरकत नसावी. यति, यतिभंग व पुनर्यति; कायदा, कायदेभंग व नवा कायदा या पद्धतीनेंच ( Hegelean Dialectic ) उत्क्रांति सुरू आहे.

अनवश्यक नियमांचीं कोळिष्टकें व जळमटें आतां फेंकून दिलीं पाहिजेत. कारण, केशवसुत म्हणतात त्याप्रमाणें, "नियमन मनुजांसाठीं" आहे, मनुष्य नियमांकरितां नाहीं. जीवन व साहित्य जितकें ताजें-तवानें व अद्ययावत् राखलें जाईल तितकें तें अधिक विकासक्षम होईल. बोरिस पेस्टरनॅक (Boris Pasternak) म्हणतो " May life be always fresh as fresh." प्रस्तुत काव्यसंग्रहाचे जनक श्री. भालेंदु यांनीं यतिभंगाविषयींची प्रस्तावनेंत व्यक्त केलेली आपली भूमिका या दृष्टीनें विचारणीय व अनुकरणीय आहे. मात्र, हे यतिभंग बेढब व निष्कारण झालेले नसावेत. स्फूर्तीच्या प्रवाही " जोशांत " त्यांची सहज निर्मिति झाली, तर हरकत नसावी, इतकेंच. यतिभंग हा मुद्दाम **घडविण्याचा** अलंकार होऊं शकत नाहीं. रशियन क्रांतीच्या प्रातिनिधिक कवि-लेखकांनीं निर्माण केलेल्या Futurism चें, ( 'अनागत-'वादाचें) भंजक स्वरूप मायाकॉस्की ( Mayakowsky ) नें पुढील शब्दांत वर्णिलें आहे. " Futurism was to spit on rhymes, arias, rose-bushes and other trash". रशियांत यमक, यति, गण-मात्रा, बिसतंतु , गुलाबपुष्पें, कमलपराग या सर्वांना काव्यक्षेत्रांतून गचांडी मिळाली असून, विशुद्ध वास्तववाद हाच आजच्या रशियांतला काव्यनिकष आहे. महाराष्ट्रीय कविता यतिभंग करीत करीत अखेरीस इतकी विवस्त्र होणार काय ? अस्तु.

अं

या संग्रहांतील कवीच्या आत्महत्येविषयींचें शेवटलें रंजक गीत वाचून पुस्तक खालीं ठेवतांच कल्पनांच्या साम्य-वैषम्यानें "माझें मृत्युपत्र" या पुष्कळ वर्षांपूर्वी वाचलेल्या बॅ. सावरकरांच्या तेजाळ कवितेचें, अभावितपणें, मला पुण्यस्मरण झालें; व खालील पंक्ति ज्वलन्त अक्षरांनीं चित्तक्षितिजावर चमकूं लागल्या. त्या पंक्तींचें प्रासंगिक अवतरण करून हा पुरस्कार संपवितों. ॐ तत्सत्

**तें ध्येय दिव्य, निजमा*तृविमोचनाचें।**
**तो उग्र निश्चयहि ते उपदेश साचे ॥**
**जें दिव्य दाहक म्हणू*नि असावयाचें।**
**बुध्याचि वाण धरिलें करिं हें सतीचें ॥**

—बॅ. विनायकराव सावरकर

५।४।३८
६२९, शनिवार, पुणें.

**धुं. गो. विनोद**

---

* येथील यतिभंग बॅ. सावरकर यांच्या धडाडीला साजेल इतका बेडर, पण पुनः आवश्यक व आल्हादक आहे. —**धुं. गो. विनोद**



दूरूनी बघतां सुवर्ण मम हा प्रासाद रम्याकृति ।
त्याची कोनशिला कुणी बसविली, येतां मनीं ही स्मृति ॥
त्या देवीस कृतज्ञतामय मनें, दावावया ही कृति ।
इच्छा होत असे ! नमो तिज अतां, राहे जरी दूर ती ॥

—भालेन्दु—

# प्रस्तावना

माझ्या आठवणीप्रमाणें वयाच्या पंधराव्या वर्षी, कॉलेजांत प्रीव्हियस-मध्यें असतांना मी माझी पहिली कविता लिहिली; व ती फ्रेन्च भाषेंत! ती त्यावेळच्या कॉलेजच्या मासिकांत प्रसिद्ध झाली होती. ती लहानशी कविता एका पोरक्या मुलासंबंधीं होती, एवढें मला आठवते. त्यानंतर आमची काव्य-स्फूर्ती जी योग-निद्रेंत लुप्त-प्राय झाली, ती एके दिवशीं अचानक जागी झाली. मी व एक स्नेही एके दिवशीं सहज फिरावयास गेलों होतों. तेव्हां विनोदी कवितांच्या गोष्टी निघाल्या. त्यानें मला थट्टेनें: "अरे, आतां तूं कांहीं कविता कां लिहित नाहींस?" असें विचारलें. त्याची खोड मोडण्यासाठीं लगेच दुसऱ्या दिवशीं: "**अमुचे बाळुकाका साधे भोळे अजिंक्य वाचाळ**" अशी त्याच्यावरच एक थट्टाप्रचूर आर्या-पंक्ति रचून, त्याच्या स्वाधीन केली, व "का, जिरली का खोड?" असें विचारलें. अश्या तऱ्हेनें या खंडिता नायिकेनें आमच्या हृदयांत पुन्हा अधिष्ठान केलें.

या गोष्टीला देखील दहाबारा वर्षें होतील. पुढें हळुहळु हा नसता उपद्व्याप करमणूक म्हणून सुरू केला. प्रथम प्रथम कवितांचे खर्डे, मी माझे स्नेही श्री. सबनीस सॉलिसिटर यांस मुख्यतः दाखवीत असें. त्यांनींही कधीं न कंटाळतां मला उपयुक्त सूचना केल्या. त्या वेळेचा विचार करितां, मला गोविंदाग्रजांच्याः "जुन्या नव्याची चोरी करून। भिकार कवि येतां कविता घेऊन। कशी तरी एकदां वाचून। त्रास चुकवितां येतसे"॥ या ओळींची आठवण येते. माझ्या स्नेह्यांच्या विषयीं मात्र मला एवढें कृतज्ञतापूर्वक सांगतां येतें, कीं "असंस्कृतास्तु संस्कार्याः भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः" या न्यायानें, त्यांनीं मला अत्यंत सहानुभूतीपूर्वक मदत केली; व कोणीही "कशी तरी एकदां वाचून" त्रास चुकविला नाहीं. या बाबतींत गोविंदाग्रजांकडे जाणाऱ्या कवींपेक्षां मी अधिक

भाग्यवान होतों. पण हें मी फार दिवस केलें नाहीं. गाडी एकदां उतरणीवर रुळावर पडली, म्हणजे मग ती स्वांतर्भूतशक्ती (momentum) नें पुढें ढकलत राहते. अशा तऱ्हेनें या सर्व कविता वेळोवेळीं लिहिल्या गेल्या. कांहीं दुसऱ्यांच्या कविता वाचून सुचल्या, तर दुसऱ्या कांहीं चित्रें पाहून सुचल्या. "चित्तचोराचें उत्तर" व भग्नहृदयांतील करुणोद्गार ऐकून" या कविता माझे स्नेही कै. ज. के. उपाध्ये ( नागपूर ) यांच्या अनुक्रमें 'चित्तचोर' व 'भग्नहृदयांतील करुणोद्गार' या कविता वाचून सुचल्या. "सागरिकेस" ही कविता श्री. सबनीस ( सॉलिसिटर ) यांच्या रत्नावली नाटिकेच्या भाषांतरांतील एका प्रसंगाच्या चित्रावरून सुचली, तर "त्याग" ही कविता श्री.माधव ज्यूलीयन यांची 'त्याग लाभे प्रेमळाला' ही कविता वाचून व राजा रविवर्म्याचें 'उर्वशी-पुरुरवा' हें चित्र पाहून सुचली. अर्थात, हीं केवळ भावनाप्रवर्तक कारणें झालीं; व त्यांमुळें त्या त्या वेळीं इतर कांहीं कारणांनीं मनांत थैमान घालीत असणाऱ्या भावनांना वाचा फुटली. मुरम्बा खातांना त्यांत अडकलेली मुङ्गी पाहून देखील स्फूर्ति उत्पन्न होऊनं नाहीं का एखादी कविता सुचत ?

या कवितांत कांहींतरी गूढ—गुंजन आहे का, हें शोधण्यांत तार्किक वाचकांच्या बुद्धीस निष्कारण ताण पडूं नये म्हणून सुरवातीसच " वाचकांस " ही कविता लिहून इशारा दिला आहे.

या सर्व कविता वेळोवेळीं निरनिराळ्या मासिकांत प्रसिद्ध झालेल्या आहेत. ( परिशिष्ट पहा ). जरी जवळजवळ निम्या कविता "भालेन्दु" या टोपण नांवाखालीं प्रसिद्ध झाल्या आहेत, तरी त्याशिवाय इतर दहा टोपण नांवाखालीं यांतील कविता लिहिल्या गेल्या होत्या. या विक्षिप्तपणाचें माझें मलाच हंसू येतें; व आयुष्य-गिरीवर आणखी एवढें चढून येऊन मागें सिंहावलोकन करतां, हा नसता लपंडाव मी कां केला

हेंच समजत नाहीं. कदाचित् चंद्र एका ढगामागें लपून बाहेर येतो, व पुन्हा दुसऱ्या ढगामागें लपतो, याचें अनुकरण मी केलें असेन काय कोण जाणे ! ( मलपृष्ठावरील चित्र पहा ).

प्रेमगीतांच्या आणि शोकगीतांच्या ढिगाऱ्यांत दर महिन्याला भर पडत असतां हा संग्रह मी रसिकांवर लादण्याचा प्रमाद करीत आहें, याबद्दल मला क्षमा असावी. मासिकांत प्रसिद्ध झालेल्या कवितांचें बाड मी माझ्या स्नेह्यांस दाखविल्यावर, सर्व कविता संकलित रूपानें प्रसिद्ध कराव्या असें मला पुष्कळांकडून प्रेमळ प्रोत्साहन मिळालें. माझ्या कांहीं कवितांविषयीं एका प्रसिद्ध साहित्यिकास व माजी साहित्य संम्मेलनाध्यक्षास अभिप्राय विचारला असतां त्यांनीं त्यांतील एका कवितेविषयीं असें लिहून धाडिलें, कीं " Your poem is so correct and polished that it hardly calls for any adverse criticism ". विद्वान स्नेह्यांच्या प्रोत्साहनानें किंचित् आत्मविश्वास आल्यामुळें आतां सर्व टोपणनांवाचीं ढगें बाजूला सारून निरभ्र आकाशांत माझ्या नांवाखालीं हा **इन्दु-विलास** मी बाहेर आणित आहें.

संकलनाचा प्रयत्न करतां मला असें आढळलें, कीं या सर्व कविता प्रेमगीतें, शोकगीतें, व वैराग्यगीतें अशा तीन विभागांत घालतां येतील. तसें करण्यांत कविश्रेष्ठ भर्तृहरि व मॅडम एला व्हीलर विलकॉक्स ( Poems of Sentiment, Poems of Pleasure etc ) यांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें होतीं. स्फूर्तीच्या डोलाऱ्यांत बसून काव्यानंदसागरांत वेळोवेळीं बुड्या मारल्यावर हातीं जीं मोत्यें ( किंवा शिंपल्या ) आल्या त्यांची निवड करून, ( जवाहिरी जसा लहान लहान मोत्यें टोंकांस घालून मध्यें मोठीं मोठीं ठेवितो, व कंठा तयार करितो, तद्वत् ) हृदय-स्वामिनी स्फूर्तीस अर्पण्यास एक कंठा तयार करावा, व एक शोकपर्यवसानी नाटक तयार करावें अशी कल्पना मला मग सुचली.

या अनुरोधानें निरनिराळ्या वेळीं लिहिलेल्या या कवितांची एक जीवनकथा वजा मांडणी केली आहे. ( कवितांचा खरा लेखनक्रम परिशिष्टांत सांपडेल ). प्रथम प्रेमोगम झाल्यानंतर प्रेमाचा उत्कर्ष "मी नाहीं तुमची ?" पर्यंत होतो. नंतर विस्कळितपणा सुरू होतो. पहिल्यान्दां त्याला 'प्रेम-मंदिरां'त संशय येतो. मध्यंतरीं 'भ्रम-निरसन', व 'भग्न-हृदयांतील करुणोद्गार ऐकून' हीं आन्दोलनें होऊन जातात. 'प्रतिबन्ध' व 'सवतिमत्सर' यांत तिला संशय येतो तिला संशय आल्यावर तो उद्वेगानें "कविता कशास ?" ( नं. २ ) म्हणतो. ह्यांत व 'कविता कशास ?' ( नं. १ ) यांत महदंतर आहे. पुढें 'प्रेम-कलह' होतो. 'निष्कलंकां'त लोक-निंदेचे पडसाद ऐकूं येतात. 'तूं टाकलेंस तर', व 'सुलतेस' यांत तो पुन्हा आर्जवें करितो. मग 'अनास्था' येते; व 'तेव्हां आणि आतां' यांत त्या पुढील स्थित्यंतर दिसतें. नंतर 'बन्धनाच्या अलिकडे' व 'प्रेम आणि कर्तव्य' यांत ती निराळ्या कारणावरून ( ज्याचें दिग्दर्शन 'भ्रम-निरसनां'त झालेलें आहे ) प्रेम-संबंध सोडूं पहाते; व 'सुकलेलें सोनचाफ्याचें फूल' धाडते. तो वैतागानें (रुग्ण-स्मृत) 'अधम-सङ्गम' म्हणतो; व 'परित्यक्तां'त पुन्हा विनवणी करितो. अशीं हीं आन्दोलनें चालतात. पुढें 'शृंखला' बोधपर आहे; व नंतर तो 'त्याग'ही करण्यापर्यंत हिय्या करतो. 'दैवाच्या पराजयां'त प्रिया हृदय-सिंहासनावर अधिष्ठितच आहे, गेली नाहीं, असें तो आत्म-सांत्वन करतो. नंतर प्रियेच्या मूर्तीचें 'अखेरचें पूजन' करून "प्रिया-विस्मृति दे", या शर्तीवर 'मृत्यूस' ( नं. १ ) आव्हान करतो. येथें प्रेम-काण्ड सम्पतें.

नंतर शोक-गीतें सुरू होऊन 'प्राणेश्वरी ! वैरिणी !!' या कवितेंत दुःखावेगाची पराकाष्ठा होते. शोकाचें पर्यवसान 'शोक-पर्यवसानां'त होऊन, तो आत्महत्येचा प्रयत्न करतो, पण लोक त्याला वांचवतात, व "गमे मज अतां बरा सुपथ शांत वैराग्य हा" असें म्हणून तो

वैराग्यपंथाला लागतो. मध्यंतरीं 'निराशा–डोहांत' बुडी मारून, व 'देवाकडे भांडण' ही करून तो मोकळा झालेला असतो.

वैराग्यांत शिरला तरी प्रियेची मूर्ति "चित्ताच्या क्षितिजावर" झळकत असते, म्हणून 'मूले कुठारः' हा महामंत्र जपत तो वैराग्याची ढाल पांघरून बसतो; परन्तु ही निवळ आत्म-वंचना असते. नंतर तो 'विजय', 'आत्मसंयमन', 'नश्वरता', 'स्वार्थ', 'माझें' वगैरे तत्त्वज्ञान बकूं लागतो; तरी देखील, "तुझें मधुर-हास्य, राहि त्रिलगूनि या हृत्पटा", असाच खरा प्रकार असतो. असें असतांही 'अलभेस' (नं. २), "तूं माझी नसलीस, गे, तरि मला कांहीं उणें ना, सये! देवाचें करणें सुबोध जरि ना, त्या बोल ठेऊं नये!!" असें सांगून, संत तुकारामाच्या 'ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें। चित्तीं असों द्यावें समाधान', या उक्तीनें, "मनःस्मशानीं, पुनर्दर्शनालोलुप आत्म्या" (सोनाळकर) चें शांतवन करूं पहातो. पुढें दैववशात्, मानलेली भार्या दिवंगत झाल्यामुळें 'दिवंगत भार्येस' एकदां आळवतो, व मग "(एका कवीचा) आत्महत्या" करतो. येणेंप्रमाणें या सर्व कवितांचा परस्परांशीं कांहीं संबंध नसतां, व त्या भिन्न भिन्न वेळीं लिहिलेल्या असतां, त्यांची सु-सूत्रबद्ध मांडणी करून, गोष्टीस एका भावनाप्रधान कवीच्या जीवन–यात्रेच्या शोक-पर्यवसानी नाटकाचें रूप आणिलें आहे. येथें माझी सूत्रधाराची भूमिका सम्पते. हें नाटक मार्मिक, व चिकित्सक रासिकांस रुचावें असा प्रयत्न केला आहे. "यत्ने कृते यदि न सिध्यति कोऽत्र दोषः". तरी क्षमाशील वाचकांनीं भला बुरा यत्न गोड मानून घ्यावा अशी आग्रहाची विनन्ति.

कांहीं कवितांत, (वास्तववाद लक्षांत घेऊन) कोठें कोठें किंचित् उत्तान शृङ्गार केला आहे (जसें ताटांत बाजूला उत्तेजक लोणचें वाढतात); त्याबद्दल पोक्त वाचकांची मनःपूर्वक क्षमा मागतो. जीवनाची कमान शून्यापासून परत शून्यापर्यंत चढत येते, म्हणून

" सर्वांस थोडें थोडें " या न्यायानें क्वचित् प्रसङ्गीं असा प्रमाद केला आहे.

काव्यवृत्तांत यतिभंगाविषयींची माझी भूमिका येथें थोडक्यांत व्यक्त करतो. ‘यति’ म्हणजे **विश्रान्ति**–स्थान; अर्थात् तें ऐच्छिक असलें पाहिजे. पर्वतीच्या पायऱ्या चढतांना वयस्क भावीक दहाबारा पायऱ्या चढल्यावर धांपा टाकित विश्रांति घेतात, तर ब्रह्मचारी एका दमांत शिखर गांठतात. सारांश, काव्याची गळचेपी करणारी, वृत्त, गण, यमक, मात्रा, इत्यादी जीं गीतप्रधान उपकरणें आहेत, त्यांत यति हा बऱ्याच सौम्यवृत्तीचा (यतिच तो!) असल्यामुळें, " देवो दुर्बल घातकः " या न्यायानें, त्याची बरदास्त गळचेपींत भर टाकण्याइतकी नसावी. (थोडक्यांत, चोर सुटून संन्यासी सुळावर जातो) आतां तर जुन्या पिढींतल्या साहित्यिकांस "गरगरां" फिरण्यास लावणारी "मुक्तछंदा"ची नवीन प्रथा नागपूर प्रान्तांतून महाराष्ट्रावर हल्ला करूं पहात आहे !!

यतींत मधून मधून बदल करण्यास दुसरेंहि एक कारण असें कीं, दर ओळींत एकाच ठिकाणीं यति आल्यामुळें, काव्यपंक्तींत एक जातीची जी कंटाळवाणी एकजातता येते, ती यतीची जागा मधून मधून एखादें अक्षर मागेंपुढें ढकलल्यानें नाहिंशी होऊन, काव्यरचनेंत थोडी सवलत मिळते. (संस्कृत भाषा समासजीवि असल्यामुळें, समास असल्यास यतिभंगाची पिडा टळते. ती सवड मराठींत नसते.) परन्तु हा प्रयोग सनातनी वाचकांच्या कितपत आहारीं पडेल ही शंका असल्यामुळें, मुख्यतः पृथ्वीवृत्तांतील एकदोन कवितांत तो करून पाहिला आहे. (‘स्वर्ग–पुष्प’, ‘भ्रम–निरसन’ पहा). ‘कर्म–फल’, ‘शंका–निरसन’ हीं शुद्ध ठेविलीं आहेत. सतरा अक्षरांचे आठ आणि नऊ असे तुकडे न पाडतां, नऊ आणि आठ असे मधुन मधुन पाडल्यास, ‘विश्रान्ति’ फारशी न लांबतां विविधता येऊन कल्पना कधीं कधीं अधिक बरी मांडतां येते. नाहीं तर गोड कल्पना यतिच्या पायीं हृदयांतच ठेवावी लागते. अस्तु.

कविता सोपी ठेवून, विशेष संस्कृत शब्द किंवा गूढ कोटि इत्यादि साधनांनी दुर्गम न करतां, भावनाविष्करण सहज–सुगम होऊन, अर्थ बोध तात्काळ होईल अशी " मराठी " लिहिली आहे. पांच षष्ठमांश शब्द संस्कृत असले, तर कविता क्लिष्ट होऊन, साधारण वाचकास दुर्बोध होते व मग तिला " मराठी " म्हणणेंहि बरोबर नाही. कल्पना जर " जातीची सुंदर " असली, तर अलङ्कारांची काय जरूर ? " Beauty unadorned, adorns the best ".

हा संग्रह छापावा किंवा छापूं नये अशा आन्दोलनांत मी हॅम्लेट-सारखा डळमळत असतां " २२ वें महाराष्ट्र साहित्य संमेलन, मुंबई " या लाटेनें मला सपशेल वर उचलून छापण्याच्या मनःस्थितींत आणून सोडिलें. या प्रसूतिवेदना आज तीन चार वर्षें चालल्या आहेत ! या वेदनांतून माझी प्रियपत्नी डॉ. सौ मालिनी सुकथनकर हिनें ( ती संमेलनाच्या सर-चिटणीसांपैकीं एक असल्यामुळें) "कविता-संग्रह सम्मेलन-प्रसंगींच प्रसिद्ध करा " असा आग्रह धरून, माझी ' सुटका ' केली; व पुस्तक छापण्याच्या कामांत परोपरीनें मदत केली, याबद्दल तिचे आभार मानणें योग्य आहे. मग जीवाची आटाकाट करून, मुंबई वैभव छापखान्याच्या चालकांच्या सहकारित्वाचा व बरेपणाचा विशेष फायदा घेऊन, कसेंबसें हें पुस्तक " in time " बाहेर काढीत आहे. त्यामुळें कांहीं ठिकाणीं अशुद्धें ( कधीं कधीं लौकर छापण्याच्या सहानुभूति-पूर्वक घाईंत मशिननें टाइप मोडून टाकल्यामुळें ) राहिलीं आहेत; त्याबद्दल वाचक क्षमा करितील. तीं शुद्धिपत्रांत दाखविलीं आहेत. पुस्तक संम्मेलन–प्रसंङ्गीं प्रसिद्ध होत असल्यामुळें, मी नामपृष्ठा-( Title–page ) वर ' अ ' ची बाराखडी वापरली आहे; व मला वाटतें, न्यायरत्न विनोदांनींही त्याच कारणानें आपल्या पुरस्कारांत, सम्मेलनाध्यक्ष बॅरिस्टर सावरकर यांच्याच एका कवितेंतील श्लोक

विनोदानें (कौतूहलानें) दिला आहे (व त्यांतील " बेडर, आवश्यक व आल्हादक " यतिभंग दाखविले आहेत).

मला ज्यांनीं कृपा करून मदत केली त्यांत राजकुमारी अक्कासाहेब पंत (संस्थान औंध) यांचे फार आभार मानले पाहिजेत; कारण, त्यांनीं सर्व संग्रह परिश्रमपूर्वक पाहून कांहीं दोष-स्थलें दाखविलीं, व प्रत्येक कवितेविषयीं आपलें प्रामाणिक मत दिलें. माझे स्नेही न्यायरत्न विनोद यांनीं माझ्या आग्रहाच्या विनंतीस मान देऊन, आपल्या स्नेहास, विद्वत्तेस, व चिकित्सकतेस साजेसा पुरस्कार वेळांत वेळ काढून, केवळ माझ्यासाठीं, लिहून दिला याबद्दल त्यांचे आभार मानावे तेवढे थोडेच होतील. त्यांच्या विद्वताप्रचुर पुरस्कारांत यतिभङ्ग, समाज–जीवन, साहित्य, साहित्यिक इत्यादि विषयांची, माझ्या काव्यसंग्रहाचा परामर्ष घेतांना, जी शास्त्रीय चिकित्सा झाली आहे, ती सर्व साहित्यिकांस विशेष उपयुक्त व उद्बोधक होईल, व महाराष्ट्राच्या तरुण पिढीला या पुरस्कारांत पुष्कळच प्रकाश दिसेल, असें वाटतें. सौ. मैत्रेयी विनोद यांनीही माझ्या कविताबद्दल आपुलकी व आवड दर्शविली याबद्दल त्यांचाही मीं आभारी आहे. पुस्तकांत घातलेलीं चित्रे कवितांनां जुळती आली म्हणून घातलीं आहेत; वास्तविक सदर चित्रें कवितांनंतर कांहीं वर्षांनी काढलेलीं आहेत. या कवितांचा चित्रांतील माणसांशी कोणत्याहि तऱ्हेचा संबंध नाहीं.

पुस्तक अतिशय अल्पावधींत व तरी देखील सुबक असें छापून दिल्याबद्दल मी छापखान्याच्या चालकांचे मन:पूर्वक आभार मानतों.

शेवटीं, रसिक वाचकांनीं या प्रयत्नाकडे दिलदार वृत्तीनें पाहून, तो गोड मानून घ्यावा, अशी सविनय प्रार्थना करून, ही बरीच लांबलेली प्रस्तावना सम्पवितों.

**जय राम श्रीराम जय जय राम**

मुंबई, ८ एप्रिल १९३८
राम–नवमी

—अलिन्दु—

# वाचकांस

**सुनीत.** ( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

बोला, वाचक ! वाचतां जरि मुदें काव्यावली ही तुम्ही
आत्म्याचा अमुच्या तुम्हां मिळत तैं कां थांग थोडातरी ?
कोणी हृद्गत आपुलें कवि कदा टांगील वेशीवरी,
ऐकावें कुतुकें जनीं म्हणुनिया ? ठेवूं नका आस ही !
आणा जाउनि शिंपली चिमुकली रेतींवरूनी तुम्ही,
रंगी, चित्रित, एक, जेविं कलिका शृङ्गारिली गोजिरी;
तीचें रूप पहाल; रंगहि पहा; सांगे न ती अंतुरी
केव्हांही अपुल्या समुद्रतलिंच्या गुह्यांतलें एकही !

हीं काव्यें समजा अशाच अमुच्या दर्यांतल्या शिंपल्या,
लाटा आणिति, भावना उसळतां, पृष्ठावरी ज्यां त्वरें.
त्या शिंपा तुमच्यासमोर असतीं आम्ही पहा टाकल्या.
पाहूनी समजूं नका बघतसां हृत्सागरींचे दरे,
जेथें ठेवियल्या जपूनि असती नौका अम्ही भंगल्या
आशांच्या; जिथ विद्रुमें बनविले विश्राम आत्म्या खरे !

( मॅडम एला व्हीलर विलकॉक्स यांच्या एका कवितेचा अनुवाद )

---

या पुस्तकांतील चित्रें निवळ कवितांशीं जुळतीं आलीं म्हणून घेतलीं आहेत; परन्तु चित्रांतील माणसांचा कवितांशीं किंवा चित्रांखालीं लिहिलेल्या शब्दांशीं अर्थाअर्थीं सम्बन्ध नाहीं.

# एक कवि कवि कसा झाला

वृत्त : आत्मवृत्त ( साकी–चंद्रकला )

कोणा एका कवयित्रीची कविता त्याला दिसली,
विचार केला : “ स्त्रीलाही जर कविता ऐसी सुचली,
तर मग कां ना मी । करूं तशा कविता नामी ? ” ॥ १ ॥

अंतःस्फूर्ती जागृत झाली, कवनेंही निर्मियलीं;
व्यसन लागलें कवितांचें त्या, कविता हृदयीं ठेली;
आत्माही द्रवला । काव्यरसें तो पाझरला ॥ २ ॥

पाहियली जी स्त्री ना त्यानें, ती गुरु त्याची झाली,
पूज्य भावना तिज विषयींची, कविच्या हृदयीं आली !
ऐसा कवि झाला । हृदयीं गर्वहि ओझरला ॥ ३ ॥

पुढें तया कळलें त्या कविता न तिनें केल्या होत्या,
दुसऱ्यानें त्या लिहुनी नांवें तिच्या छापल्या होत्या;
न तरी हृदयींचा । भाव निमाला हो, कविचा ॥ ४ ॥

पूज्य भावना हृदयीं पसरे कृतज्ञतारूपानें;
स्फुलिंग होई वडवाग्नी हें तत्व जाणिलें त्यानें.
गुरु मानी तीतें । कवि ना सोडी नीतीतें ॥ ५ ॥

---

# श्रम आणि फळ

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

“ आतां पंकज मुग्ध हें उमलुनी उत्फुल्ल होईः मला
स्वीकारील अतां, ” असें समजुनी, गुंजारवीं गुंतला,
वेडा भृङ्ग वृथा ! फुलें न लहरी तें पुष्प, दुर्भाग्य तें
भृङ्गाचें; उमगे न त्या, न नशिवीं त्याच्या कदा सौख्य तें !

“ मी चुंबीन अतां सुधांशुवदना, ” ऐशा पङ्गनीं भ्रमीं
उत्साहें उसळे वृथा निशिदिनीं, प्रेमांध दर्या श्रमी;
राही निश्चल इंदु नीलगगनीं, त्यासी न येई दया !
हांसे तो उलटा, तया वदतसेः–“ हीं चुंबनें कासया ? ”

येथें चातक चिंतुनि जल बसे, आ वासुनी बापुडा,
देवीला करण्या प्रसन्न झटतो, व्याघ्रासनीं जोगडा,
येईना जल, देवि हालत नसे; पाषाण हाले कसा !
वेडे सर्वहि; कां तयां न उमगे, हा बोध सोपा असा ? :—

“ आशापाश तुम्हां न मारि पुरतें, जीवंत राहूं न दे !
सोडी जो निज आस, तोचि तरला; ” भालेन्दु सर्वां वदे.

---

# प्रेम आणि मरण

भाळिं न संगम लिहिला; अगदीं दूर सृष्टिसुंदरी !
खिन्न बहु होई नभ अंतरीं.
चंद्राच्या रूपानें, मोहुनि, संगमोत्सुका सती,
रोहिणी निष्प्रभ होई अती.

हिमवंती नवबाला भूवरि, अरुण उंच किंतितरी !
अथवा शुभ्र वस्त्र पांघरी.
थै थय नाचे मयूर पाहुनि गगनीं मेघावली !
निराशा, व्यक्त करी आपुली.

दूर तरू त्यां लता, फुलांचे नेत्र मंद उघडुनि,
दंवाश्रू गाळि, दूर पाहुनी.
सागर भूवरि कुठें, कुठें ती स्वर्गींची चंद्रिका
तिच्यास्तव निशिदिनिं उसळे फुका.

शक्य न घडणें संगम कधिंही, दुर्लभ वनदेवता !
निर्झर रडुनि शमवि खिन्नता.
भाळिं न संगम, सखे, मृत्यु मज, येईना कां बरें ?
एकटें जिणें मृत्युसम खरें. ॥

# अलभेस

( वृत-शार्दूलविक्रीडित )

विश्वीं या मज सर्व कांहिं असतां, संतुष्ट नोहे मन
इच्छा एकचि या जगीं, न फळतां जी, व्यर्थ हें जीवन;
तूं माझी नसतां, असार सगळें; माझेंचि वायां जिणें;
तूं माझी असतीस, गे, तर मला कांहीं न होतें उणें !

श्वासांचीं करुनी कुडीं, सुबकशीं, कानीं तुझ्या घालुनी,
अश्रूंची बहुमूल्य माळ करुनी, प्रेमें तुला वाहुनी,
पंचप्राण तुझ्यावरूनि, अलभे टाकूनि ओंवाळुनी,
झालों मी असतों सुखी इहजगीं, माझी तुला पाहुनी.

शब्दांचीं मम कांकणें, तुजविना घालूं कुणाच्या करीं ?
प्रेमाचे उडवूं तुषार, नयनें, आसक्त कोणावरी ?
स्पर्शें नाजुक मी कुणास सुखवूं ? गानें कुणा झोंपवूं ?
कोणाला विनवूं ? कुणा समजवूं ? कोणावरी रागवूं ?

चित्ता तोषवुनी कुणास रमवूं ? कैसा सुखी होउं गे ?
राहूं या जगतीं कशास, अलभे ? सांगे मला तूं मृगे ?

( पुढें वैराग्यगीतांत “ अलभेस ” अशी दुसरी कविता आहे ती पहावी ).

८

# शंका–निरसन

( वृत्त–पृथ्वी )

कधीं प्रिय सई, वचा स्मरूनिया लता-अंगणीं,
ठराविक ठिकाणिं ये, नभपटीं जणूं चांदणी !
उचम्बळुनि अंतरें, अधिर, बैसलों चिंतनीं
अशा; परि न ये प्रिया, किमपि लोभही राखुनी ! ॥ १ ॥

तिचीं मृदुल पाउलें निघुनि जाति तीं ऐकुनी;
निराश मग होइ मी, भरति अश्रु मल्लोचनीं.
कशास करणें अशा अदय कामिनीची स्पृहा ?
कशास हृदयीं धगा धरुनि जाळणें देह हा ? ॥ २ ॥

प्रिये, प्रियतमे, कशी तुज न ये मुळींही दया !
कशी विसरसी सये ! वचन, लोभ सोडूनिया !
कशासि करिसी असा हृदयिं विद्ध या सेवका ?
खरी सदय जी अशी अदय तूंच झालीस कां ? ॥ ३ ॥

निराश हृदयें गृहीं परतण्या जसा मी उठें,
हळूंच सरुनी पुढें, वदत : “ चाललां, हो, कुठें ? ”

---

# स्वदेश–सेविका

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

तुष्टीनें उठतीहि रोम बघतां जी केतकीची तनू ;
हातीं चक्र जिच्या सुदर्शन फिरे, व्यासंग जैसा मनू ;
ल्याली नेसण खादिचें सुबकसें, आसक्त नित्योद्यमीं;
सावित्री सति मृत्युलोकिं विचरे, प्रेमी, सुशीला, क्षमी ॥

गर्वासी कधिंही जिच्या मनिं मुळीं, वास्तव्य तें ना मिळे;
सोशी कष्ट अमूप जी निशिदिनीं, हृद्भावनेच्या बळें;
झाला दुःखित दश हेंच बघुनी, आत्मा सुखी हो नच;
तेजें धार्मिक शुद्ध उज्वल वदे उत्कर्षदायी वच ॥

लागे चित्त सदाच देशचरणीं, ध्यानीं मनीं आवड;
केल्यानें मग स्वार्थनाश असला, हातीं न येई गड ?
कोठेंही विचरो, स्वदेश भजते; श्लाघा असो वा नसो;
ऐसी सोज्वल दिव्य मूर्ति कविच्या चित्तीं सदाही वसो ॥

भालीं ज्या पतिच्या अशी सुतनया चंद्रा असे लेखिली ।
त्याच्या सौख्यसमाधिच्या सुकथनीं स्फूर्ती ठरेना भली ॥

# चित्त-चोर

येतो निघूनि जातो। कां हें असें करी तो? ॥
येतां गमे दुरावा। निघतां गमे वळावा
सुखदुःख-हेतु होतो। कां?

न दिसे क्षणैक डोळां। होतात प्राण गोळा
हृदयास पोळवीतो। कां?
स्मरणास चेतवीतो। निद्रेस मालवीतो
चित्तास चाळवीतो। कां?

वाटे मुखा बघावें। नेत्रीं भरूनि घ्यावें
दिसतांच लाजवीतो। कां?
जवळीं बसा-हंसावें। लटकें गमे रुसावें
ठायीं विचार विरतो। कां?

वदनांत नाम घोळे। हृदयांत मूर्ति खेळे
परि तोच दूर पळतो। कां?
न कळे कशास आला। जादू करूनि गेला
भ्रमणांत जीव दमतो। कां?

(माझे स्नेही कै. जयकृष्ण केशव उपाध्ये, ज्यांच्या या कवितेला समोरील "चित्त-चोराचें उत्तर" हें उत्तर दिलें होतें, त्यांच्या इच्छेप्रमाणें व परवानगीनें, वाचकांच्या सोयीसाठीं, ही कविता येथें छापिली आहे. आज तें पाहण्यास ते हयात नाहींत म्हणून वाईट वाटतें.)

---

# चित्तचोराचें उत्तर *

( कै. श्री. ज. कृ. उपाध्ये यांची ‘ चित्तचोर ’ ही कविता वाचून )

येतो निघूनि जातो ? । विधि-चक्रिं सांपडे तो ! ॥
सुख-दुःख हेतु होतो ? । न रुचे जरी मिळे तो !
लहरी अशा स्त्रिया या । कां ? ॥
हृदयास पोळवीतो ? । चित्तास चाळवीतो ? ।
तरि चिंतिसी सदा त्या । कां ? ॥
वाटे मुखा बघावें ? । तरि कां दुरी लपावें ?
वद टाळिसी अशी त्या । कां ? ॥
जवळी बसा-हंसावें ? । मनिं हें जरी असावें
तरि दूर लोटिसी त्या । कां ? ॥
वदनांत नाम घोळे ? । परि बोलवे न, बाळे !
मग वांछिसी वरा त्या । कां ? ॥
जरि चोर दूर पळतो । पळतां फिरूनि वळतो
धरुनी न ठेविसी त्या । कां । ? ॥
मन चोरण्यास आला । पळुनी परी न गेला
मग दोष ठेविसी त्या । कां ? ॥
मन चोरिलें तुझें, ना ? । परि आपुलें दिलें, ना ?
मग चोर मानिसी त्या । कां ? ॥
जर तो असेल चोर । वर कां न होसि मोर ?
वरिसी न भामट्या त्या । कां ? ॥

---

* अधोरेखांकित ओळी समोरच्या पानावरील ‘ चित्तचोर ’ या कवितेंतील आहेत; व बाकीचें उत्तर.

# स्वर्ग–पुष्प.

( वृत्त–पृथ्वी )

जिच्या भृकुटिची कमान शिशु–इंदुसी लाजवी;
त्रिवेणि घन केशपाश, जणुं नागिणी लाघवी;
प्रसन्नहि सु–नेत्र–युग्म, समशेर ती ही खरी;
गमे तनुलता बघूनि मज ही रती सुंदरी !

प्रवालसम ओष्ठयुग्मि रचुनी सुमुक्ताफलें,
अतर्क्य मति खर्चुनी प्रभुहिं रत्न हें निर्मिलें;
कपालतटिं घर्मबिंदु जणुं मौक्तिकें शोभलीं;
धरी तिलक रम्य भालिं, जणुं नाक चांफेकळी !

नभीं उदित चंद्र, तोविं वसनीं निळया शोभली;
बघूनि मज चोरुनी प्रणय–दृष्टिनें हांसली;
सुरम्य मनमोहिनी सुदलपद्म भासे मला;
सुवर्णमय मूर्तिचा हृदयिं या ठसा लागला !

असें सुरस पुष्प विद्ध–हृदयीं फुलूं लागलें,
दयाळु प्रभुच्या वरें मज सुपुष्प हें लाभलें !

---

१३

# दृढ-बंधन

( अर्थात् : प्रीतिविवाह )

" चित्तचकोरा ! मत्प्राणेशा ! कायम मी तुमची ! "

मंजुळ शब्दें बोले ऐसीः—
" दैवहि जोडी तोडी कैसी
" दृढही अपुली, ग्रंथी, ऐसी ?
" आतां झाल्यें अभंग पाशें, कायमची तुमची ! "

" पत्नी तुमची राहो आतां,
" सौख्य सुखवितां, दुःख दुखवितां !
" दृढ-बंधन हें ईश टिकविता !
" ईश-कृपें मी राहो, नाथा ! कायमची तुमची ! "

शब्द असे उच्चारी बाला,
सोपान जधीं उल्लंघीला,
वधुप्रवेशीं, निश्चय झालाः—
" पति जो केला, हृदयीं ठेला, कायम मी त्याची "

आरक्त तिचे गालहि; नयनीं
कोमल प्रेमा; मंजुळ वाणी;
निश्चय, शांती, शोभे वदनीं !
स्कंधीं टाकुनि मान, वदे ती :- " कायम मी तुमची !

हृदयीं ओढुनि चुंबुनि वदलोंः—
" निश्चय मंगल न कधीं बदलो,
" योग्य ठरो मी तूतें ! न ढळो
" प्रेमा, ओढा, आदर, श्रद्धा, भक्ती ही माझी ! "

---

# स्वर्गीय प्रेम

( फटका—अनंतफंदी )

अनेक वर्षें वाट पाहिली जोडकरिण मिळण्यासाठीं ।
योग्य अशी, जी सुखवी आत्म्या, धैर्याची मजला काठी ॥
प्रसन्न होई देवी शान्ता निश्चय पाहुनि मम हृदयीं ।
धाडुनि देई मज वरण्याला कोमल बाला सुखदायी ॥ १ ॥

प्रेमळ साधी सुबक मनोहर थाट नसे अथवा माट ।
मम हृदयाचा कातळ झांकी प्रेमसमुद्राची लाट ॥
निजअंतरिं त्या साठवुनीया कायमचा प्रेमीं बुडवी ।
आसपासच्या रुक्ष प्रदेशीं प्रेमसुधाबिंदू उडवी ॥ २ ॥

लडिवाळीनें त्या खडकाशीं सळसळुनी मोदें खेळे ।
चहूंकडूनी गुंडाळुनि त्या सहजचि आत्माधिन केलें ॥
प्रेम-संगमा साक्षी ठेवी आरक्त नभींचा सविता ।
ऐसि वाग्वधू प्राप्त होइ मज, सागरिं मिसळे कीं सरिता ॥ ३ ॥

“ प्राणनायका ! प्राण पंच हे स्वाधिन तुझिया मी करिते ।
“ हृदयकमलिं तुज कोंडुन, भृङ्गा ! मधुर सुधारस पाजविते ॥
“ पीत रहा ती गोड मधू तूं, सोडुं नको मजला सखया ।
“ भृङ्ग जरी तूं, अबला स्त्रीचा परित्याग ना योग्य नया ॥ ४ ॥

“ अनेक कमलें सरोवरतलीं तुजला मोहक दिसतील ।
“ प्रेमाच्या परि कसोटींत तीं सारीं हलकीं ठरतील ॥
“ चंद्रकमल मी; प्रेम असे हें माझें केवल निस्वार्थी ।
“ तुझ्याच ठायीं जडली प्रीती; नकळे होई काय गती ॥ ५ ॥

" प्रेमपिपासा भागविण्या तव, साठविलें मी प्रेम खरे ।
" प्रेमसुधेचे तुडुंब भरुनी हृदयीं वाहत उष्ण झरे ॥
" ते प्राशी तूं ! पिउनी पिउनी हृदय करी हलकें माझें ।
" देउं नको मज मुळींच कांहीं, घेत रहा उलटें माझें ॥ ६ ॥

" प्रेम ही नसे देवघेविची चीजवस्त कीं बाजारी ।
" प्रेम करी जो प्रेमासाठीं तोच सुखी या संसारीं " ॥
ऐकुनि ऐशा उदार वचनां, मोहित झालों अनुरागें ।
हृदयीं माझ्या येई उमाळा; तिज उत्तरलों मग वेगें ॥ ७ ॥

" प्रिये, प्रियतमे ! प्रेमदेवते ! स्वर्गीच्या अद्भुत देवी ।
" प्रेमावरि मम ठेवि भरंवसा, भृङ्ग टाकि कमला केवीं ? ॥
" पंख दिले देवानें मज, गे, उडुनी येण्या तुजपाशीं ।
" उडुनि आलिया तूं मज ठेवीं, अडकावुनि बाहूपाशीं ॥ ८ ॥

" कृष्णवर्ण मी भृङ्ग असे जरि, अंतरङ्ग शुभ्रहि माझें ।
" स्वच्छ हिमापरि शुभ्र अंतरीं, रूप एकलें तव साजे ॥
" कृष्ण दिसे वांकडा उंस परी रस त्याचा लागे गोड ।
" शुभ्र शर्करा अंतराङ्गिंची लावित सर्व जनां वेड ॥ ९ ॥

" परी प्रेमळे, विसरूं नको, गे संशय ही निर्दय आग ।
" जाळी, पोळी, उध्वस्त करी जीवाची कोमल बाग ॥
" लपंडाव करूं नको कदाही; परस्परांचा विश्वास ।
" करुंया, सखये; मनीं भरंवसा उडे एकदांची खास ॥ १० ॥

" तो जर जाई उडुनी, राही संसारीं मग ना कांहीं ।
" बोल खरें सर्वदा, बरें तें; बोल सत्यही लवलाहीं ॥
" उगाच कांहीं तरी कुशंका, काढुनि हृदया जाळुं नको ।
" प्रेमसागरीं पोहत असतां, परस्परांचा भेद नको ". ॥ ११ ॥

---

# मधुर-हास्य

( वृत्त—द्रुतविलम्बित )

रजनि-अंतिं उषागमनें, रमे।
दशदिशा खुलतांचि, मनोरमे।
मज हुरूप सदा निजकामिं ये।
मधुर-हास्य तुझें बघतां, प्रिये ! ॥ १ ॥

दिवस हा सरतां, परतोनियां।
दमुनि, भागुनि, मी, गृहिं आलिया।
मम परिश्रम पावति लोप, गे।
मधुर-हास्य तुझें बघतां, प्रिये ! ॥ २ ॥

उपवनीं कलिका जणुं हांसते।
नभिं जणूं बिजली मज भासते।
रजनि-अंतरिं होइ उजेड, गे।
मधुर-हास्य तुझें बघतां प्रिये ! ॥ ३ ॥

प्रखरवाणि दुजी श्रवुनी मला।
असह जीवन होइ जधीं मला।
अमृतसिंचन होइ फिरूनि, गे।
मधुर-हास्य तुझें बघतां, प्रिये ! ॥ ४ ॥

मृदुल कुंतल मी तव ओढितों।
तनुलता हृदयीं कवटाळितों।
हृदयिं सौख्यछटा विचरे, सये।
मधुर-हास्य तुझें बघतां, प्रिये ! ॥ ५ ॥

मृदुल गाल तुझे कुरवाळितों ।
मधुर ओष्ठ तुझे झणिं चुम्बितों ।
मज कधीं क्षणही नच राहवे ।
मधुर-हास्य तुझें बघतां, प्रिये ! ॥ ६ ॥

जरि कदा बघण्या मज ना मिळे ।
तव सुहास्य, रमे, मग, गे, पळे ।
मम तहानहि भूक; न झोंप ये ।
मधुर हास्य न तें बघतां प्रिये ! ॥ ७ ॥

प्रियसखे, कमले, झणिं हांस, गे ।
रुचिरसें; इतुके श्रम साहि, गे,
मज बहू सुख होइ खरेंच, गे ।
मधुर-हास्य तुझें बघतां, मृगे ! ॥ ८ ॥

---

# कविता कशास ?

( वृत्त–वसन्ततिलका )

कोणी कवी निजसखीसि झणीं वदे तो,
कीं: " एक तूंच कविता रच, मी पहातों ! "
बाला वदे हंसुनि कीं: " वच मान्य आहे,
" मच्चित्त ठेवुनि गृहीं निजकामिं राहे ! १

" शांती मुळीं न तव आठव येउं देई;
" स्फूर्ती कशी मग हृदीं कवनास येई ?
" आज्ञा परी मज तुम्ही करतां म्हणूनी,
" ही घ्या मदीय कविता, कविता गणूनी:— २

' चंद्रार्पिता मधुर प्रेम–सुधा पिऊनी
' मी त्यास नित्य भजत्यें चरणां स्मरूनी
' आहें कृतघ्न परि मी, अजि काय द्यावें ?
' सर्वस्व भाल–चरणीं मम त्यास ठावें '." ३

कविः—" चंद्रासि लाजवि जिची कमनीय कान्ती,
" चुंबी जिचें वदन मी, परि हो न शान्ती,
" ती का कृतघ्न रमणी ? मज सौख्य होई
" टेकूनि भाल चरणीं नमतां तिलाही ! ४

" बाले, त्वदीय नयनीं रस जो उदेला
" मच्चित्त गुंगवि, सये, जणुं मद्य–पेला !
" हा चक्र[1]–व्यूह मज गुंतविण्या अखेरीं
" केलासि तूं, मग कशा कविता किशोरी ? ५

---

१ ' नयन ' चक्रासारखे आहेत म्हणून ' चक्र–व्यूह '.

चंद्रार्पिता मधुर प्रेम-सुधा पिऊनी
मी त्यास नित्य भजत्ये चरणां स्मरूनी
आहें कृतघ्न परि मी, अजि काय द्यावें
सर्वस्व भाल-चरणीं मम त्यास ठावें '

" हांसे तुझें मज गमे कविता, अमोल,
" त्वत्स्पर्श हीच कविता, करि चित्त लोल !
" वाणी तुझी सुकविता, मधु दिव्य गोड !
" प्रत्यक्ष तूंचि कविता, अति खोल गूढ ! ६

" आर्ये ! रसाळ कविता रचिली तुवां जी
" मी सांगतांच, मजला करण्यास राजी,
" प्रेमें धरीन हृदयींच सदा, प्रिये, ती,
" माला सुरत्नमय लेखुनि वैजयंती ! " ७

---

# फक्त प्रेमाची ओंवाळणी

( चालः—प्रतिकूल होईल कैसा, कृष्णदेव० )

नाथ ! या बसा, हो, येथें दीप दाखवीत्यें !

पाडवा असे, हो, आज;
योग्यता तसा ना साज !
गोडवा टिको, हें काज !
प्रेम-भावें चिंतुनि रूपा, दीप दाखवीत्यें !

नसे चांदीचा चौरंग,
नसे पाटही सुरंग,
परी सोनें अंतरंग !
दासि-भावें पूजुनि, भूपा ! दीप दाखवीत्यें.

नसे चांदीची आरती,
गरीबीची मेणबत्ती !
परी उज्वलीत प्रीती
उणिव भरुनि आणी सारी ! दीप दाखवीत्यें.

तुम्हां बोलिया आवडे !
चार थेंब हे घ्या, गडे !
अश्रु-स्राव चरणीं पडे !
तोच माझा अभिषेक ! दीप दाखवीत्यें.

चिमुटभरही ऊटणें,
तरी मानूं नका उणें !
चरणीं वाहिलें हें जिणें !
दुजें काय वाहूं, नाथा ! दीप दाखवीत्यें.

२१

येवढासा साखरपाला !
ओष्ठ-पुटीं धरियेला;
ओंठ लावुनी ओंठांला,
प्रेम-भेट घ्या, हो, नाथा ! दीप दाखवीत्यें.

प्रेम माझी ओंवाळणी,
हृदयीं मला घ्या ओढूनी,
म्हणा : " माझी ! माझी ! ", झणीं !
नको हिरे, मोत्यीं, सोनें ! प्रेम पुरें मातें ! ! !

---

## २१

# नूतन वर्षारंभ

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

आर्ये ! ऊठ, गडे, पहा उगवलें हें वर्ष आतां नवें
हातीं हात धरूनिया, छबकडे, प्रार्थू तया आर्जवें:–
‘ होऊं दे सुख, संकटें वितळवीं, देई मनःकामना,
‘ रक्षीं प्रकृति, तुष्टि देइं, नुरवीं आतां मनोयातना !

‘ हा वाढो वरि प्रेम-वृक्ष गगनीं, संतुष्ट राहो मनें,
‘ प्रेमाचीं कुसुमें सुगंधित करो, संयुक्त हीं जीवनें,
‘ आशांच्या अमुच्या ठरो अचल हा प्रासाद भव्याकृती
‘ धर्मीं चित्त ठरो, मनीं अचलही राहो प्रभूची स्मृती !

‘ चालूं दे अमुचा व्यवस्थितपणें संसार अव्याहत
‘ दीर्घायू करुनी अम्हां, प्रभुपदीं ठेवी अखेरीं रत !’
भार्ये ! या सुदिनीं विशुद्ध मतिनें ईशा स्तवूंया, सये,
देवो तो जगदीश नित्य अपणां निर्भेळ सौख्या, प्रिये !

---

## २३

# काय म्हणूं?

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

माझें कोड तुवां सदा पुरविलें, वेडें जरी मागणें;
आकांक्षा मनिंच्या सदा पुरविल्या, केव्हां न कंटाळणें !
हांसे गोड करी सदा करिसि जें; तूं काम–धेनू मला
निःसंदेहचि भाससी ! सु–दयिते ! "धेनू" म्हणूं, का, तुला ? ॥१॥

हातें म्यां धरिली जणूं तुज मुखीं, स्वप्नीं मला हें दिसे;
कर्णांनीं बघ ऐकिले, तव मुखीं, हृद्–बोल माझे तसे;
मी कान्हा, मुरलीच तूं ! मधुर हा आभास होई मला;
वेडी ही जरि कल्पना, मम, तरी "वेणू" म्हणूं, का, तुला ? ॥२॥

नांदे या हृदयीं, तुझ्याच विषयीं भक्तीच, बिंबाधरे !
आत्मा तूजकडे उचंबळतसे, निष्पाप, अत्यादरें;
तूं मातें गमसी विशुद्ध हिमवत्, गौरी सदा मंगला,
ठेवूनी शिर हें तुझ्या मृदु पदीं, "देवी" म्हणूं, का, तुला ? ॥३॥

या गेहीं रमलीस, तूं मजसवें, सौख्यें, ममत्वें सदा !
या देहीं रमलीस, रूप धरुनी, तूं स्फूर्तिचें, ना, सदा ?
छाया तूं मम साच, भास असला, होऊं दिला त्वां मला !
वाटेनाच खरें मला, परि, सये ! "माझी" म्हणूं, का, तुला ? ॥४॥

"देवी" तूं नससी खरी, जरि मला तूं पूज्य होसी, लते !
"वेणू" ही न खरी, न माधव तसा मीही, खुळें स्वप्न तें !
"धेनू" ही न च ! मारण्या न दिसती शृंगें कशीं तीं तुला ?
"माझी" तूं नच खास, गे, मग कशी मी हांक मारूं तुला ? ॥५॥

# भ्रम–निरसन*

( वृत्त–पृथ्वी )

जरी मजसि टाकुनी निघुनि जासि कोठें तरी,
मनीं समजुनी स्वतःस कृतकृत्य योग्यापरी,
अतां न तव हस्तिं गे, मुळिंच कांहिं, राही, सये,
असा मजसि टाकणें कधिं न योग्य तूतें प्रिये !

कसा मनिं विकल्प हा तव विचित्र आला बरें ?
तुझेंचि जरि घेसि तूं, तरि न चोरि हेंची खरें.
जलीं कधिंहि तेल मिश्र नच होइ कल्पांतिं, गे,
परी रुचिर शर्करा बनत एकजीवी स्वयें !

जरी निघुनि जासि तूं, तरिहि येइ मी, तूं जिथें;
न मोक्ष मज राहिला, फिरत तूं जिथें, मी तिथें;
फिरेहि जड लोह जेविं फिरवी तया चुंबिका;
न ही तुजसि गोष्ट केविं समजे ? वृथा कष्ट, कां !

तुझें मधुर–हास्य राहि बिलगूनि या हृत्पटा,
समंजस असूनि कां धरिसि, गे, वृथा या हटा ?
अतां तुजविना मला जगतिं या न गत्यंतर;
वृथा दुखविसी मला, झुरसि तूं, जळे अंतर !

---

* ( लग्नाचें वचन राखिल्यास "तुमच्या मातापितरांस अन्याय होईल," असें म्हणून वचन मोडूं पहाणारीस. )

इथें जडति बंध जे, प्रभुहिं बांधिले बुद्धया,
असें समज तूं मनीं, न करिं यत्न तोडावया;
तुला प्रभुहिं निर्मिली खचित माझियासाठिं, गे,
मलाहि तुजसाठिं, या जगतिं, रक्षि या गांठि, गे!

जरी त्यजिसि तू मला, नच सुटे तुझें चिंतन,
वृथा स्व-शिरिं दोष हा, दुखविसी वृथा त्वन्मन;
सु-सह्य करिसी मला निरस हें जिणें तापद
असें सुखद पुण्य-कर्म, सुभगे, न दोषास्पद!

न कांहिं करिसी कुणाहि किमपीहि अन्याय, तूं!
मदीय वच मान गे, न दुखवीं वृथा जीव तूं!
न मानुनि खरें, जरी त्यजिसि निश्चयें तूं मला
धुळींत जिव दोन हे मिळति; लाभ कैंचा तुला?

---

# भग्नहृदयांतील करुणोद्गार ऐकून

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

बाले, प्रेमलते, विशुद्धहृदये, प्राणप्रिये, तारके
होई शान्त प्रियाकडे बघुनियां, तो जो तुझा बालिके !
तो, ज्याहीं दिधलें असे स्व-हृदया संपुष्ट-हस्तीं तुझ्या
आहे ना अजुनी तुझाचि अवघा; बंदा पदाग्रीं तुझ्या ? ॥ १ ॥

आशेची कलिका खरी न गळली, अदृश्य होई जरी
नेली ना खुडुनी कुणी, जरि लपे; दीर्घायु आशा खरी !
वाऱ्यानें कलिकेसभोंर असतीं पर्णेच गुंडाळिली
आनंदांकुर तो सुरक्षित असे ! नोहेस कां तूं खुळी ? ॥ २ ॥

पाहे ती कलिका तुझी हंसतसे हृत्प्रांगणीं कायम,
आशा-भङ्ग खरा जधीं तुज सखा सोडी कृतघ्नासम;
दैवाच्या गतिनें ढगीं जरि लपे ज्योत्स्नापती चंद्रमा,
नोहे नाश तया, चिरंजिवचि तो; संतोषवीं त्वन्मना ॥ ३ ॥

आशांच्या तुझिया तुवां रचियला प्रासाद भव्याकृति,
आहे त्या भंवतीं अनिष्टहि धुकें; जाई स्वयें ती स्थिती;
आशाभङ्ग नसे अजूनि समजे, लीलाच दैवी असे;
राखे धीर; ढळूं न दे तव मनीं, आशा सदा जी वसे ॥ ४ ॥

दाता ईशहि, सत्य जोंवरि तुझा संकल्प चित्तीं लते;
येई संकट जें, स्व-काल सरतां जाई; टिकाऊ न तें;
येई कोसळण्या प्रभंजन जरी प्रासाद रोषें तुझा
राही निश्चल तो; खचे न किमपी, विश्वास जोंहे तुझा ॥ ५ ॥

बाले, हांस सदा बघूनि कलिके; जा, डोल प्रेमामधें;
वारंवार मनास बोधि, सखये; त्या निश्चयानें वदे :—
“ होई मुक्त सुधांशु, ग्रस्तहि जरी राहूमुखीं तो अतां
“ लोपे किंचित्त काल चंद्र ग्रहणीं, पावे पुनर्वाच्यता ” ॥ ६ ॥

---

# विरह-वेदना

( वृत्तः—हरिणी )

अरुण-उदयीं स्वप्नीं भासे प्रिया मज हालवी;
हृदयीं धरुनी प्रेमें मातें, मुखीं मुख लाववी.
नयन उघडी जेव्हां मी ती परी नच सांपडे !
फिरुनि मन हें अंधःकारीं स्वयें भ्रमुनी पडे.

विकसित बघे मी या बागीं, गुलाबकळे नवे,
मृदु सखि मुखीं शोभे लाली, झणीं मज आठवे;
अधरहि तिचे त्या रंगाचे; तशीं वसनें तिचीं;
स्मृति करुनिया देती मातें, तिच्या मृदु प्रीतिची.

विपिनिं फिरतां छायारुपें, फिरे धरुनी मला
करिं धरुनिया हस्ता माझ्या, प्रिया, बिलगे मला.
श्रमुनि बसतां स्कंधीं ठेवी प्रिया, शिरही कदा
रुचिर नयनें मातें पाही, श्रमी, सुभगा, तदा.

कलरव वनीं ऐकूं येतां, कदा मज भासते,
विमलहि सखी माझी कोठें समीपाचि हांसते.
दुरुनि बघतां कोणालाही, प्रिया मज ती गमे;
हृदय म्हणतेंः—" आली ! आली ! प्रिया ! " मज विभ्रमें.

अवचित कदा झोंपेंतूनी झणीं मज ओढती
मधुर वच हे " माझे भा-ल " ! मला नच सोडिती;
कठिणहि दशा या प्राणांची ! न हो रिपुला असें
विरहि हृदयीं " भार्या, भार्या ! " असें नित होतसे !

# अभाग्याचें प्रतिमापूजन

( वृत्तः—शिखरिणी )

प्रियेची घेऊनीं, सुबकहि छबी मोहक करीं,
अभागी न्याहाळी, नयन भरुनी वाहत जरी;
वदेः–" आहे कोठें, मज बहु जियेचे भरंवसे
" दुरावे कां आतां, सतत हृदयीं जी मम वसे ? "

तिचे डोळे पाही, हंसुनि बघती प्रेममय जे,
विलोकीं ओष्ठांतें, मधुमय गुलाबी, मृदुल जे,
क्वचित् भासे त्यातें, विरहिणि सखी नाम वदुनी,
तया संबोधीते, मिचकवुनि डोळे कमलिनी.

क्वचित् भासे त्यातें, पवनगतिनें केंस कुरळे,
जणूं रेशीमाचे, हलुंच उडती ते भुरभुरे;
दिसे त्याला तेथें, बघुनि सुमुखा, दर्पण जसा,
अती दीर्घ श्रद्धा, निरतिशय माया, भरंवसा.

कदा त्यातें वाटे, हंसुनि छकुली मान तुकवी;
वदे त्यातेंः " नाथा ! प्रियकर सख्या, धीर टिकवी ! "
परी भासे चर्या अवचित तिची खिन्नहि कदा,
वियोगानें नेत्रीं चमकति हिरे, अश्रुहि तदा.

धरुनी वक्षीं ती अचलहि छबी, नेत्र मिटुनी,
प्रियेच्या रूपाचें विकल हृदयीं ध्यान करुनी,
वदेः " हा ! हा ! दैवा, धरुनि, अदया, डावहि, असा
" छळा मांडीयेला ! किमपि हृदयीं लोभ न कसा ?

" करीं घेई, मेघा ! उचलुनि मला नेइ तिकडे
" असे प्रेमी राणी मम हृदयिची, शांत जिकडे;
" मला नेई तेथें ! धरुनि हृदयीं चुंबिन मुखा
" तिला गोंजारूनी, शमवुनि मना, पाविन सुखा !

---

# मी आहेंच तुझा !

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

जेव्हांही मज भेटसी, तुजकडे मी पाहतां राजसे,
ओठांनी खुणवूनियाच म्हणसी : "माझे तुम्ही !"—हें कसें ?
नाहीं कां परि शब्द : "मीहि तुमची !" ओष्ठीं तुझ्या येत गे ?
मी आहेंच तुझा ! परंतु, सखये, माझी न तूं काय, गे ?

होतों मी तव, मी असें तव, तसा राही तुझा ! तें मला
ऐकूनी नुसतें न, गे, सुख जरी माझी न तूं प्रेमला.
सांगें नित्य मला तसेंच : "तुमची आहेंच मी !", सौख्यदे !
ऐकूनी प्रिय बोल जे मम हृदीं ये शांतता, ते वदे !

केले यत्न किती तुला मिळविण्या, दुःखें किती सोशिलीं !
चिंता वाहतसें तुझ्यास्तव सदा ! तूं, ना, मला एकली ?
माझी तूं नसतां तुझा असुनियां मी काय, गे, फायदा ?
तूं माझी नच ! मी तुझा ! तव असा कैसा, प्रिये कायदा ?

हें मी सांगतसें, परी मज पुन्हां वाटे :–असें सांगुनी
बोलाया तुज लावणें, न वदसी जें तूं स्वयें आंतुनी,
सारें व्यर्थ ! सये ! प्रिये ! प्रियतमे !! माझी न तूं हें खरें !
ओष्ठीं यास्तव बोल येत नच ते !—सांगे, न का हें खरें ?



## ३०

# मी नाहीं तुमची ?

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

जेव्हांही मज भेटतां, मजकडे न्याहाळुनी पाहतां !
तेव्हां येत असे मनांत मम, हो, शंका अशी तत्त्वतां :—
माझे हे, परि देउं आठव पुन्हां ! ध्यानीं कसें राहि तें ?
नाथा ! ही स्मृति द्यावया, खुणवुनीः "माझे तुम्ही!" बोलत्यें.

होतां, हो ममही; अहां मम तसे; तैसे रहा सर्वदा !
सत्त्या या विसरूं नका परि कदा ! त्याला जपा, हो, सदा.
मी नाहीं तुमची ? खरें ! परि कशी?–नांवें!! न का हें खरें ?
नाहीं मी तुमची जरी जन–मुखीं, नाहीं असें का बरें ?

नेलें मन्मन चोरूनी, मज पुरी वेडीच केलीत ना ?
गेलें नांवहि, सौख्यही, तरि नसे मी आपुली का पुन्हां ?
मी हे प्राण तसें शरीर चरणीं नाहींच का वाहिलें ?
आतां नाथ–पदीं दुजें मजकडे देण्यां नसे राहिलें !!

मी होऊं तुमची कशी, प्रियकरा, हो, आणखी हें वदा;
मी होत्यें तुमची तशीचहि असेः "आहें," "नसें," वा वदा;
बोलूं काय ? करूं कसें ? समजवूं कोण्या तऱ्हें तें वदा !
"नाहीं ही मम," बोललांत, तुमची राहीं तरी मी सदा !!!

# प्रेम-मंदिर

(वृत्त-शार्दूलविक्रीडित)

शैलाग्रीं दुरुनी दिसे, सुबकसें तें शुभ्र देवालय;
सोन्याच्या कळसावरी तळपती रश्मी सुतेजोमय;
प्रेमाची मम देवता वसत जी तेथें, तिये चिंतुनी,
कष्टें आक्रमतों पथा, स्मरुनियां चित्तीं प्रिया कामिनी.

तापा साहुनिया असह्य रविच्या, सोपान मी कंठितों;
येतां मंदिर मी प्रवेश करुनी, हृद्देवते पाहतों;
झांकूनी नयनां, प्रसन्न हृदयें, मी चिंतितां मूर्तितें
हर्षें घेत मला हृदीं, अधर ती माझा स्वयें चुंबिते.

कंठीं घालुनि बाहुपाश विनयें, वक्षीं शिरा ठेवुनी
देई ती मज धीर, प्रेमळपणें, दुःखी मुखा पाहुनी;
"आहें मी तुमचीच, नाथ, अवघी, हे बोल माझे खरे!"
वाहूनी तिज माळ, आदरभरें मी जातसें सत्वरें.

× × × ×

* घंटानाद दुरूनि कानिं पडतां, त्या मंदिरीं, होतसे
शंकेनेंच असह्य, च-र-र्र हृदयींः- हा कोण तेथें असे?

* (घंटा खरोखरीं वाऱ्यानेंच हालून वाजते.)

# दोन पक्षी

( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

या येथें बसला प्रमत्तहि असा पक्षी निजानंदिं हा,
त्या फांदीवरि गान गात बसला, प्रेमी दुजा तो पहा !
हातीं गोफण, चिंतसी हृदयिं तूं : "दोन्ही कसे लाभती ?"
हा ! वेडे, न लभे कदापि तुजला तें सौख्य, वा ती स्थिती ! १

भोगी एकचि भालचंद्र उभयां ऋद्धीस, सिद्धीसही !
भोगी तेविं उषा निशा, विनत त्या भार्या, रवी एकही !
तैसें वैभव गे, स्त्रियांसि न लभे, दोन्ही न ते, लाभती !
साधीं एकचि, आवडे अधिक जो, दुःखीच लोभी मती ! २

साधेना जरि तो, निराश हृदया संतोषवाया, स्मरीं,
गे, वैराग्य सुमंत्र, कल्पतरु जो ! तोही फळेना तरी,
कष्टी जीवन संपवीं, तनुलता होमूनियां बापुडी;
देवाला स्मरुनी अखेर हृदयीं, अग्नींत घाली उडी ! ३

× × × ×

होई विस्मित ती पुरी, श्रवुनियां वाणी अशी ही नभीं
मागें पाहत, तों तिथें हंसतही दोन्ही पिसाटें उभीं !

---

# प्रतिबन्ध

( वृत्त–द्रुतविलंबित )

तीः—उडुनि जाशि कदा म्हणुनी भितें,
हृदय-कंटकिं मी तुज रोवितें;
जर पतंग सुटा, भ्रमणीं रत,
म्हणुनि कंटकिं तो जन, रोवित !

तोः—हृदयिं मस्करिनें धरिसी सुरी...
परि शिरे सहजासहजीं उरीं
मग कशासि पतंग उडेल गे ?
मृत पतंग पडे हृदयीं, अगे !

---

टीपः—प्रेमाच्या बाबतींत बळजबरी निरुपयोगी असते. कमळ भृंगाला अडकवून ठेवितें तरी तो आंत सुटा असून मध पीत राहतो. तशीच अवस्था प्रेमाची आहे. बंधन असून, आहे हें भासतां कामा नये; त्यांतच गोडी.

३४

# सवति–मत्सर

( वृत्त–आर्या–गीती )

सवतीवरती करितां प्रेम तुम्ही, हो, मला चकवितां, कां?
देउनियां हृदय तिला प्रेमानें, हो, मलाच, कविता, कां?
सोडा मजला आतां, द्या माझा परत प्रेम–ठेवा, हो.
अथवा सोडा तिजला, एके ठायींच प्रेम ठेवा, हो!
ही घ्या, नाथा अपुली सोन्याची अंगुठी नको मजला,
प्रेम–गुलाब फुलविला! आतां जल–हीन दीन कोमजला!
जर माझे असतां तर, एकटिचे, धन्य मानि मी मजला!
देतां वृथा कशाला प्रेमा, मन, काय, तीं निर्मी मजला?
एका म्यानीं केवीं राहूं शकतील दोन तरवारी?
मी प्रेमळ, न विरोधी! मी देई सौख्य, मी व्यथा वारी.
जर असती प्रेमळ, ती, सविनय, कोमल, प्रशांत, हळुवार,
सोडुनि तुम्हांच असतें सोशियलें दुःख मीच अनिवार.
जर सौख्य तुम्हां देती, तर कांहीं हो न मागणें माझें;
देई ना सौख्य तुम्हां, ती; देऊं द्या मला तरी माझें;

---

३५

# कविता कशास ?

( वृत्त–वसन्ततिलिका )

कोणी प्रिया निज सख्या चिडुनी वदे ती
कीं:– " दोष योग्य कविसी जन सर्व देती;
" न स्थीर चित्त, हृदयीं नच शांतता वा,
" प्रेमीं विलोल, शरिरीं न मनीं न तावा ! १

" आजी रुचे रुचिरही मृदु राधिका त्या,
" गाई तिच्या विविध गौरवमालिका त्या;
" धांवे फिरूनि बघतां मग सत्यभामा,
" त्या मालिका फिरुनि येतिल शीघ्र कामा ! २

" मी ही सुरम्य नलिनी, कमलाच ती ही,
" मी प्रेमलोलुप सुधा, मधु-कुंभ तीही,
" मी ज्योत, दीप, रमणी, हृदयस्थ राणी,
" गातां तिसी अचुक तीच पुन्हा कहाणी ! ३

" माझीच पाठ फिरतां विसराल नातें,
" शोधाल त्याच वनितें, चिर प्रेम ना तें !
" काढूनि माळ हृदयीं तव ठेविलेली,
" ठेवाल अन्य ! मग होइन ' टाकलेली ' ! ४

" सर्वस्व भाल–चरणीं हरुनी वृथा ना ?
" भालीं धरूनि विधुला, वदनीं सुधा ना !
" आतां प्रयत्न करुनी विसरूं हृदेशा !
" 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोत्र दोषः ' ! ५

" प्रेमा, सु-हास्य, वच, लोचन, वेष, ओष्ठां,
" आलिंगनें, हृदय-मोहक प्रेम-चेष्टा,
" पावेल, हो, विसर, ही नव प्रेमवंती
" हे, भाल, नाथ, मम भाल,' म्हणूनि अंतीं !" ६

कविः—

" धिक् धिक् जिणें, न जरि पात्र तदीय प्रेमा,
" विश्वास ना जरि, न ये अनुराग कामा !
" विश्वास येइ न कदा, नच बैसला जो
" आतांवरी ! न हृदयीं कवि हा विराजो ! ७

" सर्वस्व प्रेम-सरणीं हरुनी वृथा ना ?
" भालीं धरूनि विधुला, वदनीं सुधा ना !
" आतां प्रयत्न करुनी, जिरवूं मनीषा !
" 'यत्ने कृते यदि न सिध्यति कोत्र दोषः' ! ८

" आतां कशास कविता ? मम मद्य-पेला
" उत्फुल्ल होउनि पडे उपडा ! भुकेला
" सतृष्णही धडपडे मम जीव, कान्ते !
" कां लाविलेंस मज वेड, मदीय शान्ते ? ९

" गाऊनि ऐकवुं कुणा हृदयस्थ माया ?
" गाऊं कुणाप्रति गुणां तुझिया ? न माया
" राहे, हृदीं ! फुटुनि तें, रस वाहतो तो
" वाया आतां ! हृदय ना तव चाहतें तो ! १०

" तूं तूं सुरम्य नलिनी, कमलाहि तूंची
" तूं प्रेमलोलुप सुधा, मधु-कुंभ तूंची
" तूं ज्योत, दीप, रमणी, हृदयस्थ राणी !
" ना मानिसी, मग कशा रडवी कहाणी ? ११

“ मातें खुशाल विसरे ! जरि शक्य, देवी
“ मी कःपदार्थ, गुणिले ! विसरेन केवीं ?
“ मी लोहही परिस तूं ! बनलों सुवर्ण
“ त्वत्स्पर्शयोग घडतां, जरि हीन वर्ण ! १२

“ प्रेमा, सु-हास्य, वच, बाहु, सुवक्ष, सेवा,
“ ते ओष्ठ, ते नयन, वेषहि, चालणें वा,
“ आलिंगनें, च रुसणें, मधु-चुंबनें वा,
“ ते गोड आठव अतां सुखवोत जीवा ! १३

“ देईं निरोप मज ! मी सुमनें न वाहीं
“ तीं कागदी गणसि तूं ! म्हणणें न कांहीं.
“ हे शोक निष्फळ जरी तुज नाटकें तीं !
“ आतां कशास कविता ? हृदयीं सुको ती ! ” १४

# प्रेम-कलह

( चालः—भला जन्म हा तुला लाधला० )

खिन्न मुखानें बसली राधा, मस्तक गुडघ्यावरी ।
न बोले कांहीं केलें तरी ॥
सुप्रसन्नहि सदा वदन दिसे, हो, जिचें,
निस्तेज जहाले नेत्र अजी कां तिचे ?
विंचरिले नाहीं, केंस कसे वेणिचे ?
संशयग्रस्त कशानें होई, कारण नाहीं जरी ।
न बोले, कांहीं केलें तरी ॥ १ ॥

माधव राधेची हनु धरुनी, विनवी तिज बहुपरी ।
भ्रमानें व्याकुळला, हो, हरी ॥
" प्रिय राधे, ऐसें मौन धरिसी कां, बरें ?
" मी तुझाचि माधव असें, न का हें खरें ?
" तव मनीं असे तें, बोल अतां तू त्वरें,
परस्परांशीं सत्य बोलुंया, प्रांजल भाषा बरी।
फुकाचें दुःख होइ नातरी ॥ २ ॥

परोपरीनें तिज विनवी तो, प्रेमळ वेडा हरी।
तीही कोमलहृदयी खरी ॥
मग हळू हळू ती सरसावे त्याकडेः—
" मी सांगेन खरें, रागावुं नका, गडे;
" मी भोळि भाबडी, संशय मजला पडे;
"प्राणाहुन प्रिय तुम्ही असूनी मजला, माझ्यावरी ।
" तुमची प्रीति नाहीं, हो, खरी ! " ॥ ३ ॥

संशय ऐकुनि विस्मित होई, क्षणभर कोमल हरी ।
रागला, तरी मना आवरी ॥
क्षण मुग्ध राहुनी, सदुःख बोले हरीः—
" प्रिय राधे, वेडी तूं असती, गे, खरी,
तूं प्रेमपरीक्षा केलिस सखये वरी !
प्रेम न साचें माझें, तर मग जातों अपुल्या घरीं ।
विसर मज ! खोटा मी, तूं खरी ! ॥ ४ ॥

ऐसें वदतां, प्रेमळ राधा होत असे घावरी ।
हरीचा हात ओढुनी धरी ॥
" हो ! राग येवढा सत्वर येई कसा ?।
" मज टाकुनि ऐसे जाउं नका, हो, बसा !
" मम जीव घावरा होई; फिरुनी हंसा
पुन्हा असा मी गुन्हा केलिया, बोलुं नका हो हरी ।
मजला माफ करा सत्वरीं ॥ ५ ॥

---

# निष्कलंक

( वृत्त—मालिनी )

सहज फिरत जातां ताटवा देखियेला,
हरित तृण उगूनी, गालिचा जेथ झाला,
सुबक गुलछडीचें झाड तेथें उदेलें;
मधुर सुरस गंधें चित्त मोहूनि गेलें !

लवचिक मृदु देठीं, गुच्छ शोभे फुलांचा;
हृदयहर सुहास्यें भारि मातें; मनाचा
हरण करुनि ताबा, दास मातें करी तें;
विकल हृदयिं माझ्या, तृप्तता दिव्य येते !

पिउनि मधु हृदींची, गुंतलों प्रेमलोमीं,
जवळ उभय जानू टेकुनी राहिलों मी;
धरुनि हृदयिं पुष्पा, जाहलों भानहीन;
मज गमत असे मी स्वर्गि, पृथ्वीच ही न !

सुखमय सहवासीं जाहलों धुंद, वेडा;
म्हणुनि मज दिसेना येतसे दुष्ट रेडा,
जवळ जवळ माझ्या, घाणिनें माखलेला,
डुलत डुलत, डोळे रोखुनी, मातलेला !

जवळुनि मग जातां, घांसुनी देह, मातें
मलिन करितसे तो ! भाग्य ! मारी न मातें,
चिखल उडवि पुच्छें, येइ पुष्पीं कलंक;
प्रभु करि परि वृष्टी ! जाहलों निष्कलंक !

# वंचना

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

चित्तासी मम वन्हि लावुनि, सये, केलीस कां वंचना
होळी पेटवुनी, सुहास्यवदने, देसी न कां दर्शना!
कंगालासम वृत्ति केलिस, सये, चोरूनि मद्हृद्धना,
ऐसी क्रूर कशास होसि, सदये, मी काय केला गुन्हा? ॥ १ ॥

होतों मी मम मंदिरीं, सुनयने, संतुष्टही राहिलों,
प्रेमाची तव गोडि लागुनि, वृथा, ज्वालामुखी जाहलों!
आतां कां भिउनी, लपूनि, छपुनी, चोरूनि तूं पाहसी,
पश्चात्ताप कशासि, कृत्य करुनी, होसी न कां साहसी? ॥ २ ॥

कैसी तूं अदया, कठोर–हृदया, जाया मला सांगसी!
जातों, मी, परि देई हृद्धन, सये, चोरूनि जें ठेविसी!
देसी ना तरि रोष नाहिं मजला, कोपेन मी कासया?
देसी आश्रय सेवकास हृदयीं, ऐसी जिवा आस या! ॥ ३ ॥

तूं नाहींस कृतघ्न, निर्दयाहि ना; नाहींस तूं घातकी;
कां मातें त्यजिसी, प्रिये, तव कसा झालों अतां पातकी?
होईना मज बोध कां फरक हा! झाली निराशा तुझी?
वाटे प्रेम वृथा तुला? तव मनीं येई कुशंका दुजी? ॥ ४ ॥

पश्चात्ताप मनीं तुझ्या शिरत, वा? भीती? न कांहीं कळे!
कां तूं ही नव मूकवृत्ति धरिसी? वात्सल्य केवीं पळे?
दुःखी कां दिससी? तुझाचि अवघा नाहींच का मी सये?
होईना मज विस्मृती, हृदयिं या केव्हां अनास्था न ये ॥ ५ ॥

आहे या हृदयीं खिळूनि बसली, मूर्ती तुझी सौख्यदा,
तूं मातें जरि टाकिसी, तरि तुझा आहेंच मी सर्वदा;
मातें टाकुनियां तुला नच मिळे कांहीं ! न पोळी मना !
बोले ! बोल सखे, न वृक्ष जड तूं ! पाषाण ना ! बोल ना ! ॥ ६ ॥

देई सौख्य असेल शक्य तितुकें ! होई पुरें तें मला !
येईनाच मनीं जरी, तरि करी जें योग्य वाटे तुला !
टाकी वा धरि ! जाइ, राहि अथवा ! प्रेमा तरी ना सरो !
बुद्धी तो प्रभु देइ तेविं करि, गे ! तूं हो सुखी ! मी मरो ! ॥ ७ ॥

४३

# तूं टाकलेंस तर

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

मानी ना मज टाकिसी मजसि तूं, कल्पांतिंही राजसे !
होतां तेंचि कदापि, होइ मजला प्राणांति होई जसें,
किंवा काढुन मीन जेविं धरितां, पाण्यांतुनी, हो तया,
तैशा भीषण यातना, मम हृदीं, तूं टाकतां होत या. ॥ १ ॥

आहे एकचि पाय, नेत्र मुळिंही नाहींत, मी पांगळा;
श्रद्धा एक तुझी, दुज्या धरुनियां चाले जसा आंधळा;
प्रेमा एक तुझा, मला इह जगीं, तो चालवी, हालवी;
तो तंतू तुटतांचि, दैव मजला लोकांतुनी घालवी ॥ २ ॥

आशा एक तुझी जिवंत मजला ठेवी; मला एक तूं;
तूं आत्मा मम, जीव तूंहि अवघा, तूं प्राण, सर्वस्व तूं !
क्रौर्यें तूं मज टाकितां, मग वृथा राहूं कशा एकटा ?
रानोमाळ फिरेन चिंतित तुला, मी वाढवूनी जटा ! ॥ ३ ॥

किंवा लागुनि वेडही तुजमुळें मी मूढ होईन, गे,
किंवा देइन जीव, दुःखहि जरी मी भोगण्या ना शके.
लागेही क्षयरोग, जाइ झुरुनी, तैं काळ नेई मला
तूं मातें जर टाकसी, मग सये नेवो कुणीही मला ! ॥ ४ ॥

---

# सुलतेस

( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

भार्ये ! प्रेमलते, सुधांशुवदने, शान्ते, सखे, गोकुले,
ऐकूनी तव निश्चया चकित मी झालों असें, गे, सुले !
भद्रे, तूं असती, भयाण जगतीं, आधार या जीवना
जाण्याची मग गोष्ट काढुनि अतां, कां पोळिसी या मना ? ॥१॥

गासी कां असल्या प्रयाण-कवनां कां सोडण्या या गृहा
होसी सिद्ध अतां, लते, कमलिनी ? कां घातकी बेत हा ?
तूं गेल्यावरि सोडुनी, मम, सखे, होईल कैसी दशा
याचा काय विचार नाहिं तुजला ? सोडूनि जासी कशा ? ॥२॥

तूं जासी तर अन्न, गे, त्यजिन मी; पाणी तसें, प्राणही !
मी रात्रंदिन, नांव घेउनि तुझें, आक्रंदुनी, या गृहीं
या गच्चीवरि, गे, फिरेन, सुभगे; होई अशी दुर्दशा,
माझी, तूं त्यजितां, मला, सुदयिते, या दुःखकुंडीं अशा ! ॥ ३ ॥

जें कांहीं तुज सौख्य या गृहिं अतां पावे असें जाहलें,
त्यासी आठवुनी, विचार आपुला सोडीं, अतां बाहुले !
जें थोडें मज या जगीं अजुनिही आयुष्य राही अतां
तें मातें करि, गे सु-सह्य ! वच हा माझा न होवो वृथा ! ॥ ४ ॥

साक्षी ठेवुनि चंद्रसूर्य गगनीं संयुक्त झालीस, कां ?
आयुष्यीं मम, सोडुनी मज अशी, जाण्यास, आलीस, कां ?
अर्पूनी निजदेह, बंधन पुन्हां दुर्भंग केलेंस, कां ?
त्यापेक्षां, मम वेदना शमविण्या, मारी तुझ्या मालका ! ॥ ५ ॥

घेई खंजिर हा, करीं मृदु तुझ्या, हें वक्ष पाही खुलें !
मारी एकचि वेळ, नेम धरुनी, दुःखें जिथें व्याकुळे
विश्वासू मम अंध हें हृदय, गे, त्वन्नाम घेऊनियां !
चुंबीं एकचिवार या मृत-मुखा संतुष्ट पाहूनियां ! ॥ ६ ॥

# तेव्हां आणि आतां

( वृत्त-गज्जल )

अतां कंटाळसी मातें; कशाला आळवूं तूतें ?
पुन्हा गाऊनि रङ्गाणें, कशा कंटाळवूं तूतें ?

अतां तूं टाळिसी मातें ! तदा प्रेमा न सीमा ! तें
कशा पायीं ? कशा तेढा ? अतां ना इच्छिसी मातें ?

तदा तूं भेटण्या येसी मला; मी भेटण्या येतां
पहासी वाट तूं दारीं ! कडी दारीं पडे आतां !

तुझें तें हास्य आनंदी, अतां ओष्ठीं न कां नाचे !
न नेत्रीं प्रेम; दरवाजे सदाही बंद कानांचे !

तदा तूं चिन्तिसी प्रेमें, कदा ये पत्र माझें तें
जबाबी प्रेम धाडूनी, मुकेही धाडिसी मातें.

अतां राशी जरी माझ्या, उशाशीं नित्य पत्रांच्या
सदाही स्तब्ध राहूनी, ढिगां ना पाहसी त्यांच्या !

कदा मी बोलण्या येतां, निघूनी दूर तूं जासी
मला टाळूनि कामाच्या निमित्तें, दाद ना देसी !

न खाई एकटा कांहीं ! तुझा वांटा तुला देतां
तदा तो घेसि आनंदें; अतां नाकारिसी देतां.

तदा मी खर्डितां कांहीं , जपूनी ठेविसी सारीं
चिटोरीं, कां अतां जाती सदा कचऱ्यांत तीं सारीं ?

असे कोणी तुला जादू च केली, कीं नसे मी तो
जसा होतों तुझा तैसा, सखा वेडाच प्रेमी तो ?

तदा तोंडीं तुझ्या साचे सदा उद्गार प्रेमाचे
अतां कांहींच ना येई ! शिव्या देई तरी मातें !

परी आहेंच मी जैसा सुरूपासूनिही होतों,
न कांहीं जाहला प्रेमा उणा, वाढे सदाही तो.

लळा लावूनियां मातें जरी काबीज केलासी,
अतां टाळूनियां दूरी मला ढकलून कां देसी ?

तुला मी एकला; ना ? तूं मलाही एकली ! नाहीं
दुजा कोणी, दुजी कोणी, दुजें कोणी, खरें पाहीं !

अतां कंटाळसी मातें, परी कंटाळसी कां तें
न येई माझिया ध्यानीं; वदे, ना तूंच तें कांते !

# अनास्था.

( वृत-शार्दूलविक्रीडित )

तापानें रविच्या सुकूनि सरिता होई जरी कोरडी,
वर्षावें भरुनी चढे सुजल तें; उल्लंघुनीयां थडी;
हांसे ना परि पुष्प जें सुकतसे, कोमेजुनी तें पुन्हा
प्रेमाचा पहिला बहार सरुनी जातां पुन्हा येईना !

गेले ते दिन जेधवां स्व-हृदयीं पूजी मला कामिनी,
राखी मान सखी तदा, नच अतां पर्वा करी भामिनी !
गेला तो भर ओसरूनि अवघा, उत्साह, ओढा ! न तें
राही स्वप्न, सरूनि जाई सुखही; आयुष्य होई रितें !

माझी किंमत राहिली नच अतां ! ठेवीयली ना च मी,
प्रेमाहूनि कनिष्ठ मान गणुनी हा घातला नाच मी;
जें कष्टाविण प्राप्त होई मनुजा, त्याची न आस्था तया
आहे सत्य जरी, तरी मम मना जाळी सदा आस या !

चंद्राचा सरतो प्रभाव सरतां रात्री; रवी ये नभीं
होई तेंच इथें ; परी मृत-हृदा ! काळास या तूं न भी !

# बंधनाच्या अलिकडे

( वृत्त–भिल्लीण - दिडकी )

प्रेमा दिधलासी, सखया फार उशीरां,
त्या काय उतारा.
हें तोडुं कसें बंधन, येण्या तुजलागीं ?
मी नार अभागी!
माझ्या हृदयाचा कमठा, प्रेमचि ओढी,
अन् हृक्शर सोडी.
सोडी जरि हे मी शर, भिल्लीण न साची,
—ती ओढ जिवाची.
काळीज विदारी, तरि नाहींच शिकारी;
मी दुर्बल नारी!
घायाळ करूनी तुज, घायाळचि ठेवी !
घेऊं तुज केवीं ?
घेतां हृदयीं त्या जखमा, होत बऱ्या रे!
घेऊं न शके, रे!
हें बंधन जीवा सुकवी, धीर न राही!
कां अंत न होई ?
जीवासि कशी मी शिकवूं त्याग कराया ?
रे, मोहक राया!
भालींच नसे, संगम का ? मीच अभागी!
प्रेमा मज डागी!

राहीन अशी या जगतीं प्रेम कराया,
अन् शोक कराया.

मैना अटके पंजरिं या, पंखचि वांया,
माझ्या शुकराया !

येईन उडूनी तुजलागीं सुटतां, रे
मी ना फसवी, रे !

माझ्या हृदयेशा ! बघ हा जीव जळे, रे;
ना भोग टळे, रे !

---

# प्रेम आणि कर्तव्य

( चाल–कशि या त्यजूं पदाला )

कशि या त्यजूं पदाला? येईल का पुन्हा तें? ॥ ध्रु० ॥

ऋणभार हा पित्याचा, नशिबांतल्या पदाचा,
त्यजुनी, सधर्मिणीचें, जोडूं अशक्य नातें?
पद हें दिलेंत, का, हो? देणार तें दुजा, हो;
अन्याय त्या कसा, हो, केल्या रुचे प्रभूते?

दिधलेंत प्रेम, राया! प्रेमा रुचे मना या;
परि सोडुनी पदा या, केवीं धरूं तुम्हातें?
प्रेमा तुम्ही दिला, ना? प्रेमाहि मी दिला, ना?
तुटला हिशोब हा, ना? दुःखी असे कशा, ते?

तनु-संगमीं कदाही, सत्सौख्य, हो, न राही,
हृत्संगमीं नरांही, ये शाश्वती, सुखातें!
तुमचीच मी मनानें, प्राणेश्वरा! असे ना!
कां तेवढें पुरें, ना? मारूं नका जिवातें!

असती अभंग साचीं, दृढ बंधनें मनाचीं;
तुटती न; तीं सदाचीं; न वियोग तोडि नातें!

---

**टीप**—वेळींच कर्तव्यदक्षता न राखल्यामुळें ज्या प्रेमांध अभागी जीवांचा प्रेमाच्या पवित्र मंदिरांत प्रवेश होतो, व "प्रेम कीं कर्तव्य" या कैचींत जीं सांपडतात, व शेवटीं कर्तव्याचा जय होऊन प्रेम-मंदिरांतून मागच्या पावलानें एक एक पाऊल मागें टाकित जीं वाट काढितात, त्यांच्या हृदयांत होणाऱ्या तळमळीचें व कालवा-कालवीचें या कवितेंत वर्णन आहे.

( या कवितेंत किंचित फेरफार करून ग्रामोफोन रेकार्ड
N. 5103 H. M. V. बनविला आहे. )

# सागरिकेस

( वृत्तः—मालिनी )

न करि, करि कांते, घोर या आत्मघाता !
स्वकरिं किमपि, शांते, देहसंहार आतां ?
विषम-समय येतां, धैर्य सोडूं नको, गे;
मधुर प्रणय-तंतू व्यर्थ तोडूं नको, गे. ॥ १ ॥

कसुनि हृदय पाही, दैव; निःशंक होई;
हृदयिं अभय राही, संकटां तोंड देई.
निबिड रजनि-अंतीं, सूर्य जाज्वल्य येतो,
ग्रहण-समय जातां, चंद्रमा मुक्त होतो ॥ २ ॥

निरत तृषित भर्त्या, केविं सोडूनि जासी ?
निकट प्रणय-ग्रंथी, कोविं तोडूं पहासी ?
जरि न तुज रुचे हें, येवढा शब्द ठेवी,
पतिसहगमनाचें, पुण्य संपादिं, देवी. ॥ ३ ॥

तुजविण जगण्याचें, दुःख मी कोविं साहूं ?
भयद निरस गेहीं, एकला केविं राहूं ?
सुखकर यम-सद्मीं, आत्म-संसार जोडूं;
विरह नच रुचे हा; जोडिनें, देह सोडूं !

---

# अटकेंत

( वृत्त—गज्जल )

वेड ऐसें कां मला तूं लाविलें ?
　　कां असा वेडा करूनी, टाकिलें ?
" नाहिं, हो, कध्धीं, पुन्हा " तूं सांगसी
　　एकदांही वेड हें कां लाविलें ?
चुंबिलें सप्रेम आरम्भीं तुला,
　　कां न तूं तेव्हां मला झिट्कारिलें ?
पिंजऱ्यामध्यें कशा तूं येसि या ?
　　प्राण माझे ओढुनी कां घेतले ?
राहिलों मी एकला अट्कंत, गे
　　केविं जाळींतूनि जासी, सोनुले !
शीळ माझी ऐकुं ना येई तुला ?
　　कीं तुला बंदींत कोणी ठेविलें ?
पिंजऱ्याबाहेर राहूनी तरी
　　चोंच घाली चोंचिमाजी, गोकुले !
ना तरी अस्तित्व हें कष्टी, सखे,
　　संपवूनी प्राण माझे चालले !

———

# सुकलेलें सोनचाफ्याचें फूल

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

जातां दूर मनीं विचार करिते कोणी बिचारी प्रिया,
उद्यानीं बसुनी, दिनान्त—समयीं, नाथास चिंतूनियाः—
" हे नादान पहा मला विसरले, गेल्यें न मी तोंच कीं;
" स्वार्थी हे नर-भृंग, जे विसरती पुष्पा ! खरे पातकी !

" घेती शोषुनिया मधू मधुरशी, होई रितें तें स्वयें;
" पुष्पाची परि वेदना हृदयिंची, त्यांच्या मनीं कां न ये !
" द्यावा आठव आपुला मधुरसा, येती कदापी पुन्हा
" येई कींव कदापि, यत्न करुं या, येवो, न येवो मना. "

हातीं पुष्प धरी, सुवासिक बरें, काढूनि वेणींतलें
चाफ्याचें, कनकाङ्गि, उग्र, बरवें, भानु-स्वरूपीं खरें,
तेजस्वी, सुकुमारही ; मग तया हुंगूनिया ती सती,
गुंडाळी जपुनि, सुकोमलकरें, धाडी स्वनाथाप्रती.

हा ! हा ! कोमल पुष्प तें विखरुनी जातें सुकूनी पहा !
त्याच्या कोमल पाकळ्या निखळुनी जाती स्वयें त्या, अहा !

---

# अधम–संगम

( वृत्त—द्रुतविलम्बित )

( शंकराच्या पिंडीभोंवतीं नाग कां ? )

दिसत वारुळ एक नदी–तटीं,
विमल शोभत सन्निध धूर्जटी;
पलिकडे वट–वृक्ष जुनाटसा,
अमितपल्लव, सुदृढही तसा. १

सतत चिंतन एक करी तिथें.
प्रबल पन्नग; नाजुक पंचुतें
बघत, निश्चल लोचन राखुनी;
मधुर पंचु–रवा नित ऐकुनी ! २

अशि समाध कितीक तपें करी !
बघुनियां दृढ–भाव तदंतरीं,
अतुल साळु तया भुलवावया
दवडि तो प्रभु, सत्व पहावया ! ३

बघुनि ती ललना मृग–लोचना,
उपजली हृदयीं दृढ वासना;
अमित केश–शरां भुलुनी तिच्या
उरग सोडि पथा मग नीतिच्या ४

मनिं म्हणे अशि ही सुमदालसा
मज मिळूनि फळो मम लालसा !
खचित गेह सुशोभित ही करी,
सुखद जीवन; ही वनिता बरी ! ५

अवदसा सुचली मग पन्नगा;
धडपडे हृदयीं धरण्या धगा!
प्रथम होतहि नष्ट जधीं मती
मग फिरे रिपु-चक्र सभोंवतीं! ६

वरुनि पन्नग ती नव भामिनी,
निज-गृहीं शिरतो तिज घेउनी;
व्यथित होइ परी शर-संग्रहीं;
सुख न देइ कदा वनिता गृहीं! ७

निज सयेसि सदा विनवीतसे :-
"निघुनि जाइं अतां! मज होतसे
"असह जाच तुझा, नित; ना तरी
"निघुनि जाइन मीच कुठें तरी" ८

मग वदे वनिता स्व-पतीसि, हो :-
"मज कशासि तुम्ही वरिलेंत, हो?
"'मज वरा' म्हणुनी चरणीं न मी
"पडुनि प्रार्थियलें! वरिलें तुम्ही!" ९

हृदय-भेदक भाषण ऐकुनी,
सुशिल पन्नग दुःखित होउनी,
त्यजुनि तापद वारुळ, हो, त्वरें,
जवळच्या शिव-देउळिं तो शिरे!! १०

# परित्यक्त

किति करूं विनवणी तुज, शान्ते !
कां कणव न ये अझुनी, कान्ते ? ॥ धृ० ॥

वेडा होउनि, येतां पाठीं,
वरिलेंसि मला, प्रेमासाठीं;
जन्माच्या ज्या पडल्या गांठी,
तोडिसि त्या, करुणावन्ते ?

वचनें देउनि घेउनि चुकलों,
परस्परांचीं कायम ठरलों,
टाकुनि देण्याइतका बनलों
अपराधी, आतां, कान्ते ?

समज असेनहि मी अपराधी,
दया याचितां, तरि तूं क्रोधी !
क्षमा कराया कितिशी अवधी
प्रेमल हृदया, गे, शांते ?

कोण मनुज, गे, नाहीं चुकला ?
पश्चात्तापें परि तो जळला;
पाहुनिया हें, कोमल, बाला,
अंत पाहि का, गे, दयिते ?

जरि प्रेमाब्धी हृदयीं सुकला
असे तव तरी सांगे मजला !
मृत-हृदया घेउनि जायाला
दिशा मोकळ्या मग मातें !

स्पष्ट बोलुनी होइ मोकळी !
रहा सुखानें मग तूं अपुली !
आशेपेक्षां निराशा भली
तोडि एकदां जीवातें !

तैसी तीव्र निराशा होतां,
भग्न कपाळा लाविन हाता !
मग मी सोडुनिया तुज जातां
शेवटीं तरी हंस, कान्ते ! !

---

५९

# शृंखला

( वृत्त—मालिनी )

" द्विज 'सावधान' ऐसें सर्वत्र विवाह—मंगलीं म्हणती ।
तें एक रामदासें ऐकियलें त्या असो सदा प्रणती " ॥

मोरोपंत.

हंसतमुख उभा हा, आत्मघातीं प्रसन्न;
मृगजलसम स्वप्नीं, मूर्ख कैसा निमग्न;
विविधकुसुमग्रंथीयुक्त हा, अंध, वेडा;
जणुं निजबलिदाना जाई, हो, मत्त रेडा. ॥ १ ॥

रुचिर मदिर दृष्टी लुप्त मुंडावळ्यांनीं;
उरग–कुसुममाला झोलितो, हा, गळ्यानीं;
न करि मनिं विचारा, वंदितो मृत्युपाशा;
कधिंहि न उमगे त्या, भग्न होतील आशा ! ॥ २ ॥

मधुर सुरस गानीं, चित्त त्याचें निवालें;
सुखमय भवितव्यीं, ध्यान, हो, गर्क झालें;
जरि जन म्हणती, त्या 'सावधान् ! सावधान' !
नयन मिटुनि घाली लग्नपाशांत मान ! ॥ ३ ॥

करिं पदिंहि खुषीनें घालितो शृंखला या,
तनु झडुनिहि जातां, झोंबती अस्थिनां ज्या !
पळ, पळ, भ्रमरा, रे, होइ बा 'सावधान' !
अझुनि समय आहे, आपुलें राखि भान ! ॥ ४ ॥

# त्याग

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

प्रेम लाभे प्रेमळाला, त्याग ही त्याची कसोटी

माधव ज्यूलियन

वेडा होउनियां, तुला भुलुनियां, मागें तुझ्या धांवलों;
धांवूनी थकलों, परि न हटलों, प्रेमांत मी पोहलों;
तूं मत्ध्येय, सखे; अलभ्य जरि तूं, ध्यानीं न तें आणिलें;
तूंही टाकुनियां गळयांत, असला हा फांस कां ओढिलें ?

मी वेडा, परि तूं हुशार खरि, ना ? ना पाहिलें हें कसें ?
प्रेमा तूं दिधला मला, परि न तो लाभे, अहा, राजसे !
दुर्दैवी म्हणुनी तुझ्याविण मला पृथ्वींत या राहणें;
सोडूं केविं तुला परी न उमगे ! साहूं कसें हें जिणें.

जाशी का उडुनी, प्रिये ? पसरले हे बाहु मी, येई गे !
ये ! वक्षीं तुज मी धरीन फिरुनी ! चुंबीन ते ओष्ठ, गे.
नाहीं ? ! ! कां छळसी ? अहा ! वदत मी हें काय, प्राणेश्वरी !
कां प्राणां मम घेउनी, प्रिय सखे, जाशी अशी तूं तरीं ?

त्यागें लाभत प्रेम, लोक वदतिः सांगे, खरें, का गडे ?
टाकूं का तुजला ? तसें करुनिया पाहूं, जरी नावडे ?
त्यागें तूं जर लाभसी—विसरतों ! तूं लाभसी का तशी ?
देवा ! विस्मृति दे ! तशी मज मिळो माझी पुन्हा उर्वशी !

---

# दैवाचा पराजय

( वृत्त-शिखरिणी )

" असे, रे, ती कोठें, तुज बहु जियेचा भरंवसा,
" तुझी ती वेल्हाळा ? न दिसत कशी ? व्याकुळ कसा ?
" तुवां ' माझी ! माझी ! ' म्हणुनि धरिली आत्म-हृदयीं;
" परी दैवें नेली ! ", वदति मजला सर्व जनही !

अहा ! रे वेड्यानों ! न दिसत तुम्हां ? दोष तुमचा !
प्रिया, छाया, जाया, मजजवळ आहे मधु-वचा;
पहा खोलूनी हें हृदय मम, दारें उघडुनी;
विराजे ती तेथें सुमणिमय सिंहासनिं मनीं.

कुठें, कैसी, गेली ? त्यजि मज कधीं ? हा भ्रम कसा ?
कधीं दैवें नेली ? न मज जवळीं कां वदतसां ?
असे जेथें होती, अचल जणुं देवी सु-मधुरा,
दिसे होती जैसी; घुमत श्रवणीं, प्रेमल गिरा.

गुलाबी ओष्ठीं ती रदन-मणि-माला फुलतसे,
सु-नेत्रीं प्रेमाचा अमृतमय सांठा मज दिसे,
प्रिया मुग्धा मातें मधुर-तर हास्यें सुखवितें,
बसे अंकीं, झोपे शयनिं मम, मातें बिलगते !

पहा ! प्रेमें दैवा सहज हरवी ही मम सती !
विधी नेई मूर्ती जवळुनि ! परी मृण्मय न ती !
हृदीं राही अष्टौप्रहर मम जाया प्रिय जरी,
कशा देही मूर्ती, हृदयिं असतां चिन्मय खरी ! !

# अखेरचें पूजन

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

‘ करिं ठेवुनि कोमल गाला । करि विचार न कळे कसला । सारखी.

—गोविंदाग्रज ( वाग्वैजयंती )

छायाचित्र समोर ठेवुनि तुझें, पूजा तुझी मी करीं,
हस्तीं शुभ्र वहावया तुज, सये, मी सोनटक्के धरीं;
नेत्रीं लावुनि नेत्र-पाश, जडला आत्मा तुझा या हृदीं,
पंच-प्राण गणूनि पांचहि फुलें ठेवीयलीं त्वत्पदीं !

वस्त्रें श्वेतहि, शुभ्र वर्णहि; तशी म्यांही फुलें योजिलीं,
प्रेमा शुद्धहि, कीर्ति शुभ्रहि तशी ! पुष्पें तुला शोभलीं !
गालीं हात, विचारमग्न दिससी, केशांचिही पामरी;
होई भास दिसे जणूं मज महाश्वेताच कादम्बरी !

नेत्र स्थीर ! गंभीर चिंतन ! दिसे शून्यीं तुला काय, गे ?
दुग्धीं वीष ? भविष्य दाखवि तुला वैधव्य ? काळीं ढगें ?
वाटे काय सभोवतींच विळखे घाली तुझ्या नागिणी ?
कीं मोडी दृढ-प्रेम-मंदिर तुझें, त्वेषें तुझी वैरिणी ?

कां ऐसी मज खिन्नता दिसतसे ? गंभीर हृद्वेदना ?
भार्ये ! तूं करिसी विचार कसला ? शान्ते ! मला सांग, ना !

# मृत्यूस

( वृत्त–मंदाक्रांता )

मित्रा मृत्यो ! सदयहृदया, सौख्यशांतीनिवासा !
देहांतीं तूं खचित विलया, नेसि या मत्पिपासा,
ज्यांच्यायोगें निशिदिनिं मला होइ अत्यंत ताप,
घेईं आतां मज निज-हृदीं, तूंचि मा, तूंचि बाप ! ॥ १ ॥

बंधो, त्रात्या ! उघडुनि अतां, आपुले बाहुपाश
झेलीं मातें ! तव चरणिं मी, होउनीया निराश,
येतों आतां अवनतशिरें, ठेविण्या प्राण माझे;
ते स्वीकारीं, मज नच अतां सोसवें तप्त ओझें ! ॥ २ ॥

देईं शांती, कधिंहि न मिळे, येथ, आत्म्याप्रती जी;
वारीं तापा, अप्रतिहत जो, या मदात्म्यासि गांजी;
येईं बापा, स्वकरिं धरुनी, नेइ मातें सु-धामीं;
आहे आशा अझुनिहि मला, तेथ होईं सुखी मी. ॥ ३ ॥

तूंते देती सकलजन कां दोष निष्कारणें, रे ?
सर्वांचा तूं अससिहि सखा, मित्र, बंधू, खरा, रे !
या देहाच्या असह, सदया ! यातना संपवीशी,
सर्वांसी तूं अचल समता निश्चयें दाखवीसी ! ॥ ४ ॥

देसी ना, रे विस्मृति मजला येथल्या एक माझ्या
प्राणांपेक्षां प्रियकर अशा व्यक्तिची, मृत्युराजा ?
ती ना देसी तर मग नको नेउं, बापा, मला, तूं !
भोगूं दे, रे, मज निशिदिनीं, यातना येथल्या तूं ! ॥ ५ ॥

येथें आहे, व्यथितहि जरी, मत्प्रियेच्या समीप,
अंधारीं या मज गमत जी, धैर्यदायी प्रदीप.
येणें तेथें हृदयिं धरुनी प्रीति, रे, मत्प्रियेची
होई मातें विफलहि, सख्या, तापदायी खरेंची. ॥ ६ ॥

---

सर्वस्वां मुकतां पुरी बधिरुनी वेडावलेली मती,
त्याचा ध्यासच एकमेव धरते; होई अमर्त्या स्मृती !
या लोकीं घडलें न जें विधि-बलें तें प्रेम-संमीलन
इच्छा-शक्तिमुळें घडेल अपुलें लोकान्तरीं काय न ?

कवि यशवंत
( यशोधन )
१२३

# निराशा

( वृत्त–उपेंद्रवज्रा–उपजाति )

बहू प्रयत्नें तुज मेळवूनी,
हृन्मंदिरीं ठेवियलें जपूनी;
तोडूनिया जीव उपाय केले,
तरी, प्रयत्नां यश कां न आलें ? ॥ १ ॥

स्वर्गीय ज्योती ! तुज रक्षण्या मी
प्रयत्न केले जरि अष्टयामीं,
तरी न कां कष्ट तडीस गेले ?
प्रभो, असें शासन काय केले ? ॥ २ ॥

अनिष्ट वारा न तिथें नडावा,
प्रेमाब्धिचा लाभ मला मिळावा,
म्हणूनि रात्रंदिन जागलों मी,
दुर्भाग्यडोहीं पडलों तरी मी ! ॥ ३ ॥

हातीं धरी मी बहुरत्नमाला,
परी न लाभे फुटक्या कपाला,
अनिष्ट दैवा नच पाहवे तें,
रिपूजनांना नच साहवे तें ! ॥ ४ ॥

देवा ! मला सौख्य दिलें कशाला ?
नेणार होतासि जरी, दयाला ?
मीं काय केलें ? मज कां, प्रभू, तूं
ऐसें छळीलें, तव काय हेतू ? ॥ ५ ॥

मुखांतला ग्रास कशासि नेला,
दुःखाग्निगर्भी मज नष्ट केला!
प्रभो, दयाला, नच कींव येई
तुला! अतां हे मम प्राण घेई! ॥ ६ ॥

त्वेषें हृदीं खंजिर रोविला कां?
सुधारसीं वीषहि घातलें, कां?
नेऊनिया, त्वां, मम दीप, ऐसें
भयाण केलें गृह नर्क, जैसें! ॥ ७ ॥

आत्म्याविना देह जगेल कैसा?
श्वासाविना प्राण टिके न तैसा!
तेलाविना दीप जळेल का, रे?
पाण्याविना मीन जगे कसा रे? ॥ ८ ॥

न सोसवे दुःख मला अतां हें,
असह्य झालें जगणें मला हें!
कधीं दया येइ तुला कराया
प्राणान्त आतां, मम देवराया! ॥ ९ ॥

तैसें जरी ना करिसी दयाला,
दुर्भाग्य माझें, मज भोगण्याला
शक्ती तरी दे, टिकवी बळाला,
आयुष्य राहे तव, हे कृपाला! ॥ १० ॥

---

# स्वप्नांतील संसार

( वृत्त—उपेंद्रवज्रा उपजाति )

लळा, प्रिये, कां मज लाविला हा ?
शकूं कसा आवरण्यास मोहा !
तुला पहावें, पहातां हंसावें,
हंसे तुझें पाहुनि धन्य व्हावें. १

वक्षीं धरावें, वरुनी पहावें
मुखा तुझ्या, सस्मित, तृप्त व्हावें;
बोटें तुझ्या केशवनीं फिरावीं,
हनू तुझी किंचितही धरावी ! २

मनीं तुझ्या उद्भवतांच कांहीं
न सांगतां तें करुनी, सदाही
आनंद मानूनि, कृतार्थ व्हावें;
सदा तुझ्या सन्निध वावरावें. ३

मुद्रा तुझी न्याहळुनी पहावी,
इच्छा तुझी मी झणिं पारखावी;
कधीं रुसावें, लटकें; पहावें
हट्टा करूनि, मग मी हंसावें. ४

चुकूनि होतां अपराध कांहीं,
क्षमा तुझी मागुनि मी पुन्हाही,
यावें तुझ्या सन्निध प्रेम–भावें;
पुन्हां मला त्वां हृदयीं धरावें ! ५

प्रेमा तुझा ही, आशा तुझी ही !
आधार तूंही, ममता तुझी ही !
तुझ्याविना, सांग, कुणास वाहूं ?
तुझ्याविना, सांग, कुणास चाहूं ? ६

अनिष्ट केव्हांहि तुझें न व्हावें
म्हणूनि रात्रंदिन मी जपावें;
ईशा स्मरावें ! नवसां करावें,
प्रिये, तुझें इष्टचि नित्य व्हावें ! ७

× × ×

संसार हा स्वप्नमयी ठरावा !
आनंद साचा न कदा मिळावा;
दैवा, तुला हेंच हवें असेना ?
होवो तुझें ! भोगिन यातनांना ! ! ८

७१

# चांदणी

( वृत्त—शार्दूलविक्रीडित )

होतों बैसुनि मी सचिंत शिखरीं उत्तुंग, अग्रीं, नभीं;
सन्मार्गा वरुनी, सुवर्तनबलें, कालासिही मी न भीं !
ईशा चिंतुनि केन्द्रिभूत करुनी आशा, तशा भावना,
इच्छीं, जीवनवृक्ष रुक्ष फुलुनी, संतोष होवो मना !

होई ईश दयालु ये मम नभीं तारा, प्रिया कोमला;
सौंदर्यें, स्व-गुणेंहि जीव हरुनी, ती वेड लावी मला !
तेजस्वी, हंसरी, जणूं, सु-कलिका, चित्-हारिणी, चांदणी,
आशा-वृक्षि फुलूनि, दिव्यहि नवी ये शांतता मन्मनीं !

आनंदी मजसारखा नच दुजा; उत्साहि, तेवीं सुखी,
दैवा तें नच साहवे ! न बघवे तें हास्य माझ्या मुखीं;
धिक् ! तें दुर्बल-घातकी ! मम नभीं ती ढांसळे चांदणी !
लोपे हर्ष ! शिरे विलाप हृदयीं ! तें ढांसळेही क्षणीं.

* * * *

देवा ! देव न तूं, जरी परत तूं घेसी दिलें जें स्वयें !
दैवा ! तूंच वरिष्ठ ! देव असती कीं तूंच ? चित्तीं न ये !

# स्त्री

( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

जगाच्या विनाशा । स्त्रियांच्या विभूती ।
देहा कष्टावीती । अपकारें ॥

— भालेन्दु.

देवा ! कां असली भयंकर तुवां उत्पन्न केलीस ही,
शिक्षा मानव जातिला बुडविण्या, स्त्री-रूपि ! जाळी मही
प्रेमें वा निज मत्सरेंच, अथवा क्रोधेंच, लोभेंच वा;
सौख्यीं ठेवुनि वा, विमूढ करुनी मोहेंचि वा मानवा !

प्रेमें दास करीच, घे हिरवुनी स्वातंत्र्य; लोभें धना;
ठेवी वा करसंपुटीं भुलवुनी; क्रोधें दुभागी मना;
ठेवी घट्ट धरूनियां च नरडी, नाचे जधीं मत्सरें;
देई सौख्य कदा जरी विधिवशात्, केव्हांच तेंही सरे !

कामें व्याकुळ होउनी करितसे कर्तव्यहानी कदा;
राही तेवत जाळण्या, भुलवुनी, वेड्या पतंगां सदा;
वैराग्यव्रत पाळुनी झुरवि वा भक्तां; महा ताप हा !
शक्ती ही, असली विनाशि, न कदा लाभेच हातां पहा !

आहे एकचि या जगीं सुसह जी, नोहे दुजी कोणती !
देई जी, प्रभुजी ! मनासि सुख या तूं जाणसी कोण ती !

---

# सुवर्ण

( वृत्त-हरिणी )

धरणि-हृदयीं, शोधूनीयां तुला मिळवीयलें,
वितळवुनियां अग्नी-कुंडीं, तुला मग गाळिलें;
चमकसि तदा अंतःतेजें, " सुवर्ण, " खरेंच तूं !
परि न ठरसी दुर्भाग्याच्या घरांत, अधीर तूं !

हृदयिं धरिलें " सोनें ! सोनें ! ! " म्हणूनि जरी तुला;
जपत बसलों अष्टौ-यामीं : न चोर हरो तुला;
परि न मम या यत्नां येई मुळीं यश हें कसें !
गमवुनि तुला मी हा ठेलों ! नशीब कसें असें !

प्रभु-पद-तलीं माझी सेवा पुरी नच जाहली;
जलद सरली पुण्याई, गे ! मुळीं नच राहिली !
मज जवळुनी नेई तूतें, विधी हरुनी, पहा !
हृदय मम हें दुःखें होई दुभंग तदा, अहा !

गमवुनि बसे सीतेलाही प्रभूवर रामजी,
करुनि पुतळा सोन्याचाही, तया हृदयीं पुजी;
गमवुनि तसें मीही पूजीं सुवर्ण, भिकारि हा,
हृदयिं जळतो शोकाग्नीनें, " सुवर्ण ! अहा ! अहा ! ! "

---

# प्राणेश्वरी ! वैरिणी !!

( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

ठेवूनी जधिं मान प्रेमळपणें पाठीवरी मी तुझ्या,
घेऊनी तव नाम, हात धरिले, निःश्वास सोडूनिया,
कां मातें झिटकारिलें न चिडुनी, रागावुनी, त्या क्षणीं ?
केली कां अवहेलना नच तदा ! प्राणेश्वरी ! वैरिणी !

कां मातें प्रिय जाहलीस, गुणिले ! कां लाविला हा ळळा ?
अष्टौयाम न चैन, गे ! ! मम पुरा कां कापिला ना गळा ?
कां मत्स्वास्थ्य असें वृथाच हरिलें, मद्वैर तूं साधुनी ?
कां मातें स्व-करेंच ना विष दिलें, प्राणेश्वरी, वैरिणी ?

कां मद्हृद्धन चोरिलें ? मम अशी केली दशा, कां प्रिये ?
गेली भूकहि, झोंपही; स्मृति तुझी सोडी न चित्ता, सये !
पूर्वीं काय दिलेंस तूं ? तव कसा झालों असा मी ऋणी ?
झाली कां ऋण-फेड पूर्ण, वद गे, आतां तरी, स्वामिनी ?

ये ! ये !! ये !!! हृदयींच घे ! विरह हा ना सोसवे, गे, मला !
घे मातें; न तरी हरील, बघ, हा मृत्यूच वेगें मला !

---

# भिकारी

चाल–" गोकुळिंचा कान्हा कोणी "

सौख्य–लक्ष्मि माझी सारी संपविली काय रे?
सौख्य–मौक्तिकांचा कंठा घालविला काय, रे ? ॥ धृ० ॥

केंवि मला घाई सुटली !
रत्नपुरी केंवी लुटली !
संपुनीच आज भिकारी, जाहलोंच काय, रे ?

सौख्य–अमृताचा सिंधू,
संपविणें बिंदू बिंदू,
प्राशुनी त्वरेंचि, भुकेला राहिलोंच काय, रे ?

मागतों सुखाची भिक्षा,
दैव ठेवि पाठीं शिक्षा,
या पुढतीं दुःखचि आतां, राहिलेंच काय, रे ?

पीत–वस्त्र, खांके झोळी,
चित्त चिंतनें संभाळी,
प्रेम मारिं तत्वज्ञानें, हेंच अतां काय, रे ?

---

# निराशा-डोह

( चाल—प्रतिकूल होई कैसा )

काजळाहुनी ही काळी, रात्र अंधकारी !
भीत भीत एखादीही
मंद तारका दिसे ही;
दिशा पाहतां दहा ही,
अंधकार जेथें तेथें, माजला विषारी !

शून्य, ओसही किनारा;
वृक्ष एकही न; वारा
मृत जाहला बिचारा;
हा पहा निराश-डोह ! नीर हें विषारी.

पोहती तिथें बिचारे,
जीव, शोक-मग्न सारे,
भग्न आशांचे मनोरे,
दैव वाचवी अभाग्यां ! ठार कां न मारी !
क्रूरतेचा अर्क हा ही;
एक नौका तेथ राही;
दैव तींतूनीच पाही,
काळजांतल्या रुपेरी, नग्न ही कट्यारी !

काटक्यांची एक वृष्टी,
दैव फेंकी जल-पृष्ठीं;
त्या धराया आर्त मुष्टी,
धांवती, वेड्या बिचाऱ्या ! कोण त्यांतें वारी ?

काळजांतुनि ये रुधीर;
जीव होती ते अधीर;
दूर दिसे त्यांते तीर;
हात पाय झाडती ! कोणी न त्यांतें तारी !

ऐका ! रुदनाचे सूर,
नेत्रीं अश्रूंचेहि पूर,
कोणी बडवीती ऊर !
दैव हांसे ! खेळणीं, असहाय तीं बिचारीं !

वीज आशेची चकाके,
येई जाई ! सर्व फुकें;
जीव जाई अंतीं भुकें !
दैव मेळवी जयश्री ! कोणी न त्यांतें वारी !

---

# धडपड व्यर्थचि ही

( वृत्त–अंजनीगीत )

सखे ग, धडपड व्यर्थचि ही,
करुं कशास धडपड मी ?
कोठें कांहीं स्थीर दिसेना
एकचि आशा, तीहि फळेना
दैवा, मुळिं कींवहि येईना ! धडपड व्यर्थचि ही

अथवा संसारा टाकोनी,
भगवीं आभरणें घालोनी,
जावें दूर कुठेंहि निघोनी ! धडपड व्यर्थचि ही.

अथवा जीवा कंटाळूनी,
मोक्ष आपुला घ्यावा करुनी
कायमचे सर्वा टाकूनी ! धडपड व्यर्थचि ही.

कशास जगणें ? काय पाहणें ?
नश्वर जगतीं काय राहणें ?
व्यर्थ यत्न हे, व्यर्थ हें जिणें ! धडपड व्यर्थचि ही.

जगतीं भरली खोटी माया,
पाहवें तेथें येई खाया,
भग्नाशांची भेसुर छाया ! धडपड व्यर्थचि ही.

विश्वासाचा तुटला धागा,
प्रेमालाही नुरली जागा,
कशासि करणें व्यर्थचि त्रागा ! धडपड व्यर्थचि ही.

तिष्ठत होतों तुझिया साठीं
धीराची तूं मजला काठी
तीहि मोडली, हे जगजेठी ! धडपड व्यर्थचि ही.

---

# निराश प्रेम

( वृत्त–मालिनी )

नच मधुरहि प्रेमा, राजसे, दावि मातें,
बघुनि नयन प्रेमी, ते तुझे, दुःख होतें;
विसर मज, गडे, ना, आस सोडून देई
विफल समज प्रेमा! पूर्णते तो न येई!

अदय खचित मानी, दैव, सोडी न पिच्छा;
हृदयिं मुळिं न आतां बाळगी फोल इच्छा;
फसवणुक असे ही, साच! वेड्या जिवाची;
तळमळच नशीबीं, आपुल्या नित्य साची!

करपुनि तव, शान्ते, चालला देह होमीं;
मजहि न मुळिं राही त्राण, कंटाळलों मी;
झगडत किति राहूं प्राक्तनाशीं, कळे ना!
प्रभुसि ‘ सदय ’ केवीं लेखती, हें कळेना!

कडकडुनि मिठी, गे, लाडके, एक मारी,
नयनिं नयन, ओष्ठां ओष्ठ, लावूं अखेरीं!
“ न च खलु परिभोक्तुं, नैव शक्नोमि हातुम् ”
विधि मम मति कुंठी! सांग तूं केविं वर्तूं!

# प्रेम-संन्यास

( वृत्त-गज्जल )

नको प्रेमा, नको हा मोह वेडा; हा नको चाळा,
खरीं जीं प्रेम-पुष्पें, तीं जगीं होतात पाचोळा;
खरी जी प्रेम-गुंफा तींत सर्पां सांपडे ठाव,
दुज्या पाहूनि आनंदीं, विषारी मारिती घाव!

गुलाबां तेविं प्रेमाच्या, सदाही थोरले कांटे,
" नको हा गंध! होई नाश!" ऐसें प्रेमळां वाटे!
सुवासी केवड्यासी प्रेम-रूपी शोधितां, बुंधीं,
पहा, गे, नागिणी, सांगेः-"पळा, ठेवूं नका धुंदी!"

झरा, तो गोड प्रेमाचा, जरी वाहे, न तो थांबे,
पिण्या जातांच पाणी तें, गजेंद्रा नक्रही झोंबे!
सुखाच्या एक बिंदूभोंवतीं सताच दुःखांचा,
कुडीं तीं घालुनी, शांते, मिळेना ठाव शांतीचा!

जगीं वैराग्य मंत्रासी जपी, ये शांतता साची
सु-वस्त्रें नेस नारिंगी! गुलाबी टाक, प्रेमाचीं!
वृथा कां घालिसी होळींत देहा, वा, मना आतां?
निघालों, लाडके, मी हा भजाया वामना, आतां!

---

# होऊं बालक मी तुझें ?

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

होऊं बालक मी तुझें ? मग तरी खेळेन खांद्यावरी !
तान्हूलें, सकुमार, गे ? मग तरी झोंपेन मांडीवरी !
सोनूलें, छकडें, तुझें ! मग तरी मारूं मिठी ना तुला ?
आनंदांकुर मी तुझा ! मग तरी घेई हृदीं, गे, मला !.

सोडी ना क्षणही तुला, प्रिय सखे, नाचेन मी भोंवतीं !
हातीं हात, फिरेन मी धरुनियां ! आनंद–दायी स्थिती !
झोंपीं जाइन मी कुशींत तुझिया, डावीकडे, सांगसी
जेवीं तूं मजला ! उरावरि शिरा ठेवूनि, माला जशी !

धांवें मी तुझिया पुढें दुडुदुडु; ओंचे धरीं; वेणि ही;
गालीं घांशिन गाल, ओष्ठहि तुझे चुंबीन, गे, नेत्रही !
ओष्ठीं ठेविन बोट, प्राणसखये, मानेवरी मान मी !
टेकूनी गुडघे पुढें, तव हृदीं ठेवीन माथेंच मी.

आंघोळी मज घालिसी; मम मुखीं सुग्रास देसी तदा,
उष्टाही, मज तो गमेच; मजला तूं चुंबिसी, गे, सदा;
ज्या सौख्या असुनी सखाच, परका; तेवीं मिळे तें मला !
देवा ! दे मज जन्म शीघ्र असला ! हा मार्ग सोंपा भला ?

---

# देवाकडे भांडण

( वृत्त–शार्दूलविक्रीडित )

देवा ! भांडतसें तुझ्या जवळ मी, अन्याय केलास तूं !
गाऱ्हाणें मम ऐक ! तूं सदय, ना ? न्यायी न तूं ? देव तूं ?
शक्ती प्रेम करावयास दिधली, त्वद्रूपि, ना तूंच, रे ?
व्यक्ती ही दिधलीस प्रेम करण्या, तूंची न का हें खरें ?

केलें प्रेम तियेवरी, विसरुनी मी भान ही, स्वार्थ ही;
केलें प्रेम तिनें तसें मजवरी, तोडूनियां जीव ही.
दोघें एक मनीं, जरी नच जनीं, भार्यापती जाहलों;
मी विश्वास धरूनियां तुजवरी, निश्चिंत ही राहिलों.

केलासी परि घात ! दुर्बल न मी ! नेलीस माझी सखी !
केंसानें वध कापिलीस, सदया ! तूं मान माझीच कीं !
कां हा खेळ असा करूनि मजला, अर्धाभुका ठेविला ?
कोठें भूतदया तुवां लपविली ? हा न्याय, रे कोठला ?

*　　　*　　　*

देवा ! न्यायी न तूं ! न ही सदय तूं ! तूं शक्त ! निःशक्त मी !
शक्तीनें तव मोहजाल चिरुनी, चालेन मी या तमीं !

---

८३

# मातेस !

( वृत्त-स्रग्धरा )

" आई ! आई ! ! " म्हणूनी, तव शवचरणीं लोळणीं घातली मी;
ठेवूनी शीर्ष वक्षीं, मृत अचल तुझा देहही हालवी मी;
टाहो फोडूनियां म्यां, रडुनि रडुनियां, दीर्घ आक्रांत केला ;
कां आली ना दया, गे, मज यमसदनीं कां सवें ना च नेला ? ॥१॥

मातें संभाळिलें त्वां, सतत जपुनियां गर्भि, कष्टूनियां, गे !
मातें पोषीयलें त्वां, स्तन-मधुर-पयें आत्म-जीवेंच, ना, गे ?
माझ्या सौख्यार्थ, माते, निज सुख हरिलें, जाळिला स्वार्थ, ना, तूं ?
आणी कैसा अखेरीं, फसवुनि मजला, गांठिला स्वर्ग, गे, तूं ? ॥२॥

जेथें तूं तेथ मीही, जणुं हरिणी सवें, राहि बच्चें सदा ही;
सौख्यीं, दुःखीं, प्रवासीं, न तुज जवळुनी दूर झालों कदा ही;
या देहा सोडिलें तूं, तरि शव धरुनी, झोंपुनी राहिलों मी,
आणी गेलीस केवीं ढकलुनि मजला एकली सौख्य-धामीं ? ॥ ३ ॥

तूझ्या पश्चात आल्या, इतर जरि तरी, तूं कुठें, त्या कुठें गे !
कोठें सोनें खरें तूं, हिणकस, बघ, त्या; पोंचती ना तुला, गे.
देवी ! कोणी न प्रेमी, तुजसम, जननी ! गुंतल्या स्वार्थ-लोभीं !
त्यांच्या स्वाधीन, माते ! मज अदयपणें केविं जासी करूनी ? ॥४॥

" आई ! आई ! ! " करूनी, रडत तव असे नित्यही तान्हुलें, गे.
ऐकूं येई न तूतें ? प्रिय, प्रिय, जननी ! ऊठ, गे, ऊठ वेगें,
प्रार्थी देवास आतां ! मज तुजजवळीं आणण्या त्यास सांगें,
आई ! कंटाळलों मी ! सु-सह इह-जगीं एकली तूंच, ना, गे ? ॥५॥

---

# आतां पुन्हां येई का ?

( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

या येथें बसली रमा, प्रियतमा, रंभोरु, चंद्रप्रभा,
या स्कंधावरि मान टाकि, सुभगा, प्रेमांकिता, दुर्लभा;
या मांडीवरि बैसुनी मज मिठी मारी, प्रिया, राधिका,
ती भार्या मम, प्रेमलोलुप, सुधा-इंदू, पुन्हां येइ, का ? १

या येथें दिनरात्रिसंधिसमयीं, सर्वस्व अर्पूनियां,
माझी कायम जाहली मधु-वचा, रंभा, मयूरी, प्रिया;
या कोचावरि बैसली, चिमुकली, प्रेमांध, ठेवी निका
गालीं हस्त, सुहास्य-मंडित-मुखा; आतां पुन्हां येइ, का ? २

या गच्चीवरि बैसुनी मजसवें, मिष्टान्न भक्षीयलें;
या गादीवरि गंजिफांत मजला, मोदें जिनें जिंकिलें;
स्कंधीं ठेवुनि दिल्रुबा, मधुरसा आलाप घेई निका,
ती जाया मम, भृंग-नेत्रि, विमला, आतां, न हो, येइ का ? ३

खेदें जी रडतां जिच्या मृदु मुखा चुंबीयलें म्यां क्षणीं;
अश्रू चुंबियले, जिच्या अडविलें, ओष्ठीं विलापा क्षणीं;
चुंबूनी पद मी जिला विनविलें: "आतां पुरे नाहिं, का ?"
ती माझी वनिता मला सुखविण्या, आतां न, हो, येइ का ? ४

पेयें सन्निध बैसुनी मधुर जी प्याली इथें एकदां;
मत्संगें फिरण्या प्रभात समयीं जी येतसे कामदा;
माझीं प्रेमसुमें सुकेशिं धरि जी, आनंदि, संगोत्सुका,
ती माझ्यासह, चारुगात्रि, फिरण्या, आतां न हो येइ, का ? ५

जी माझ्यासह पातली, शशिकला, गंगौघिं, नौकातटीं;
देवी-मंदिरिं, नारिकेल धरुनी, हातीं उभी, जी नटी,
माझ्या बाजुस राहिली, सुनयना, प्रार्थीत, जी बालिका,
ती माझी मृग-लोचना, सुदयिता, आतां न हो येइ, का ? ६

येईना जरि ती, मजप्रति अतां मत्कंठरत्नावली,
हीं चित्रें गतकालिचीं ममहृदीं प्रेमें तिनें खोदिलीं;
हीं दृश्यें टिकतील या स्मृतिपटीं, चंद्रार्क हे जोंवरी !
हा आत्मा निजधामिं मुक्तहि असा जाई स्वयें तोंवरी ! ७

---

# उषा–लोप

( वृत्त–गजल–श्यामला )

झालें पुरें ना वर्ष हें, संबंध तो संपूनिया ?
जाऊनियां देवी उषा, येई निशा संसारिं या !

ती रक्तिमा त्या गालिंची, जी कुंकुमाही लाजवी,
प्राची प्रतीची रंगवी जी नित्यही जीवाचि या,

ती जाउनी आतां नभीं साम्राज माजे रात्रिचें;
तारे जरी डोकावती, ती हृत्प्रभा पावे लया !

जाऊनि वायू शीत, झंझावात या गेहीं उठे,
काळया ढगांचे ढीगही येती अतां आभाळिं या.

त्या पाखराच्या कूजना–जें वेड लावी या मना—
ये मुग्धता ! घूत्कारही भेसूर येती ऐकण्या !

तें हास्य पावे लोप, जें आणी हृदीं या शांतता,
मूर्ती निमाली मंगला, जी सौख्य दे आत्म्यासि या !

संपूनि शुक्लाची दशा ये कृष्णपक्षा ऊत हा ;
येई अमावास्या कधीं संपूनिया दुष्काळ हा ?

या कालचक्राचे जरी खाली वरी फेरे तरी
कां रात्र मोठी ठेविसी, दैवा ! न येई कां दया ?

पूर्वेकडे लावूनि मी डोळे असे, या चिंतनीं:–
येई कधीं माझी उषा, संतोषवी जीवासि या !

हे प्राण जातां शीर्ष हें अंकावरी घेण्या तरी
येवो उषा, ती अंतकालीं, मोहना, माझी प्रिया !

---

# शोक–पर्यवसान

( वृत्त-पृथ्वी )

प्रशांत जलधीतटीं सुबक एक नौका डुले;
नभीं विकल होतसे विधु असह्य हेव्यामुळें;
समीरण बनूनि मत्त, करि नृत्य शीडांसवें,
सविस्मय कुतूहलें बघति चांदण्यांचे थवे! १

नभीं उदित चंद्र, पाश जणूं काम–हस्तीं निका;
हृदीं विकल होति प्रेमिजन, मोहवी चंद्रिका
कुणीं डुलत, गान गात कुणि, ताल देती दुजे,
कुणीं पडुनि झोंपती, अरसिकाग्रणी मूर्ख जे. २

करीं शिर धरूनियां युवक एक तेथें उभा
हताश, हत–बुद्ध, मूढ, विरही, परित्यक्त हा!
नभीं बघुनि चंद्रही, विरहि, टाकलेला, फिका,
गमे निज–चरित्र–साम्य तिकडेहि त्या भाविका. ३

दिसे सहचरी कठोर–हृदया तया रोहिणी
प्रभूसि निज टाकुनी फिरत जी नभः प्रांगणीं!
म्हणे स्वगतः–“ कासया जगतिं एकला राहुं या
“ चरित्र निज संपवूं! यम-पदीं चला राहुंया! ४

“ कदा मम प्रियेसि दुःख किमपीहि होई जरी,
“ बघूनि मृत–देह हा स्व-पतिचा अखेरीं तरी,
“ पुरें मज!” असें म्हणूनि उदधीमधें तो पडे;
सहानुभावि चंद्रमा क्षितिजिं मित्र–दुःखें बुडे! ५

भयें चकित होउनी, अचल होत नावेकरी;
त्वरें पळत नाव, जेविं हरिणी वनांभीतरीं;
तिला पळवितो समीर, जणुं निश्चयी पारधी,
पळे बचाविण्या स्व-जीव, न विलोकि मागें कधीं! ६

परी नच सरे अशी कठिण दैवलीला अहो!
तयासि उदधींतुनीं धरुनि काढिती लोक, हो.
मनीं म्हणतसेः न दे नशिब मोक्ष होऊं, अहा!
गमे मज बरा अतां सुपथ शांत वैराग्य हा. ७



तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन् कर्म परमाप्नोति पूरुषः ॥

गीता ३–१९.

९१

# " मूले कुठारः "

( वृत्त-शार्दूलविक्रीडितं )

चित्ताच्या क्षितिजावरीच उगवूं आतां नको, गे, नको!
या नेत्रें तव मोह जालिम वृथा पाडूं मला, तूं, नको!
वस्त्रें हीं भगवीं पहा, कवच हें! मी ढाल ही पांघरीं
सत्वाची; भुलवूं नकोच मजला! जा, आपुल्या तूं घरीं.

हातीं या, बघ, ही कुठार कसली, वैराग्यरूपी असे;
प्रेमाची मधुवल्लि या दृढ-तरू मी तोडण्या घेतसे;
नोहे या मनिं किंतु लेशभरही, नष्टाश मी, स्त्री-अरी;
स्त्री-हत्या घडवूं नको; परतुनी जा आपुल्या तूं घरीं.

नेत्रीं या, बघ, ही अतां तळपते ज्वाला! न प्रेमा अतां;
प्रेमाची सुकुमार वेल न जगे; स्पर्शें जळे ती लता;
हातीं माळ धरूनि मी जपतसें:-" मूले कुठारः!"; तरी
सौख्यें जा निघुनी त्वरें, मधु-मुखे; जा आपुल्या तूं घरीं.

राहे आत्म-सुखार्थ दूर, सुभगे; वक्षीं न या उष्णता
मेलेल्या हृदयीं; म्हणूनि अपुल्या संसारिं राहीं अतां;
बाळें होतिलही तुला, जप तयां; होई सुखी तूं तरी.
जा! जा! जा!! जवळीं न ये, प्रणयिनी! जा, आपुल्या तूं घरीं!

# विनत पतिता दाखवि दिवा !

" जिची छाया वांया भुलवित जिवा या निशिदिनीं
" कुठें आतां कांता शिखरिदशना ती शिखरिणी ?"

माधव ज्यूलियन.

( वृत्त–शिखरिणी )

जिच्या प्रीतीहोमीं सकलहि जिणें म्यां हरपलें,
जिच्यासाठीं टांकें हृदय–रुधिराचें अटविलें,
जिच्यापायीं आत्मा हरुनि बसलों मीचहि खुळा !
दुरावे ती आतां, जडुनि हृदयीं फोलहि लळा ! १

जिच्या शुद्ध प्रेमीं, गुरफटुनि मी, धुंद बनलों;
झरे प्रेमाचे जे, भुलुनि नयनां त्यां, विसरलों
स्वकर्तव्यांचें तें कठिण असिधाराव्रत सुनें.
हरी तीतें नेई ! हरि हरि सुखा ! व्यर्थहि जिणें ! २

जिच्या ओष्ठीं, जेवीं मधुप कमलीं तेविं रमलों,
स्व–शीर्ष स्थापूनी मृदुलतर वक्षीं विरमलों,
घडामोडी साऱ्या इतर जगिंच्या मी विसरलों,
तिला नेई दाता ! मिळवुनि सुखा तेंचि हरलों ! ३

मना संबोधीतों:—" क्षणिक सुख हें, नश्वर बरें ! '
वदे प्रेमा:—" वेड्या ! क्षणिक कधिही प्रेम न खरें !
सुटेना प्रेमाचा अचल वळसा ! विस्मृति न ये !
प्रभो ! धांवे, पावे ! स्वपदिं रमवी, सत्वरहि ये ! ४

वियोगें माझें हें मन तळमळे ! कांहिं न सुचे !
प्रभो ! कांहीं केल्या शमत न च हे वेग मनिचे !
वदे, आतां वाहूं अनलपदिं वा त्वत्सुपदिं वा,
प्रभो ! कष्टी देहा ? विनत पतिता दाखवि दिवा ! ५

---

## ९३

# विजय

( वृत्त-शिखरिणी )

झटूनी, इच्छेतें वळवुनि बळें, सुष्ट बनवी;
सदा शोधी सत्या, सुमन तव निष्पाप बनवी;
जरी मार्गी येती, तुज भुलविण्या मोहक नवीं
नवीं दृश्यें, धीरें चुकवुनि तयां, शील टिकवी. १

नसे कांहीं जैसें तुज दिसतसे तेंवि बरवें;
भ्रमें वांछा होई सुख मिळविण्या नित्यहि नवें;
खुले राखी डोळे; प्रभु-पद मनीं चिंतुनि करी
जगीं तूंही ऐसा विजय; तरि पावेलच हरी २

# आत्मसंयमन

सुनीत--( वृत्त-शार्दूलविक्रीडित )

हिंडे या जगतीं, निरंकुश जसा, स्वच्छंद वाऱ्यापरी,
जन्मूनी मनुजांत मूढमति जो, षड्शत्रुतें जिंकिना;
क्रोधाविष्ट मतीसि नावरि, करी मूर्खापरी वल्गना;
कामें पीडित होउनी, निशिदिनीं, दुर्वर्तना आचरी;
उन्मादें फुगुनी, "विशाल जगतीं, नाहींच माझ्यापरी,"
ऐशा मूढभ्रमांत राहि बहुधा, आपत्तितें मानिना;
मोहें अंध बनूनि, सत्य समजे, केव्हांहि जें सत्य ना;
जाळी मत्सर ज्या, सुशान्ति वरिना, देहान्त होई तरी;

लोभानें मतिहीन होउनि करी अन्याय्य द्रव्यार्जन;
भूलोकीं विचरे पिशाच्च मतिनें, रूपें मनुष्यापरी;
ऐसा कीटक-वृत्ति दानव खरा, निर्बंध त्याचें मन;
पक्षी, पन्नग; श्वान, सूकर बरे, निर्बुद्ध ते हो जरी !
धिक् धिक् व्यर्थ जिणं, जरी न अपुलें ओढूनि घेसी मन !
भालेंदू ! धरि, रे, पवित्र मति तूं सद्वर्तना जोडून !

---

# नश्वरता

( वृत्त-शिखरिणी )

विघाती व्याघ्राच्या अचिर चपला त्वेषलहरी;
लया तैशा जाती, गगनपटलीं, तेजलहरी;
पतंगाला लाभे क्षणभरहि ज्योतिस्सुख खरें;
क्वचित् दीर्घायू तें! युवति रतिचें प्रेम न खरें;

जरी रूपें गंधें कमलकलिका मोहित करी,
विलासी भृंगा, तो क्षणभरहि वास्तव्य न करी!
धनाढ्याचे तोरे, मृगजलगुणीं, ते हि न खरे,
कधींही सौख्याचें मनुजहृदयीं स्थैर्य न खरें!

क्षणार्धें जाती त्या रमणिहृदयीं प्रेम-लहरी;
नसे दीर्घक्षोभी सदय सविता, प्रेमल हरी;
जरी लक्ष्मी येई, त्वरित गतिनें जाइ निघुनी;
न राही कोठें ती गृहिणिसम हें ख्यातचि जनीं !

निसर्गाची शोभा अतिपरिचयें बेचव ठरे;
सुमित्राचें येणें सतत गमनें क्षुल्लक ठरे;
मनीं राही शांती अचल न कदा चित्त शठ रे !
प्रशांतादुर्गेच्या स्तवनि भजनीं सौख्यहि ठरे!!

---

# स्वार्थ

(वृत्त—आर्या-गीति)

"माझा" "माझी," "माझें"! वेड्या! कैसा उगाचि तूं गणसी?
जें ताब्यांत नसे तव, त्यासि वृथा आपुलेंचि कां म्हणसी!

वाया भ्रमांत पडसी, ओढुनि घेसी गळयांत छाया, रे!
डोळयांत धूळ टाकी, अंध करी तुज, अजिंक्य माया, रे!

कोणीहि नसे तव, बा! जो तो सांभाळि आपुल्याचि जिवा;
स्वार्थ-त्यागी वेडा, कवि, अथवा देश-भक्त, संतचि वा.

पाणी गळयासि लागे, तेथवरी वानरी पिलासि जपे,
मग त्या घाली खालीं, स्वार्थाच्या होम-कुंडिं प्रेम खपे!

"आत्मानं रक्षेत्," हें तत्त्व असे लोकमान्य सोपेंची,
"नाथैरपी, धनैरपि," या कालीं नारी मानिती हेंची.

---

# " माझें "

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

जो कोणी नवखा शिरूं बघतसे, संसारवासीं, तया,
हें बोधांजन तीक्ष्णही तरि बरें, मी इच्छितों द्यावयाः—
बा, ठेवूंच नको कदा इहजगीं आशा अशी ही उगी;
जें " माझें " म्हणुनी हृदीं धरिसि तूं, होईं तुझें या जगीं !

प्रेमाचा मिळतो सखा न बहुधा; तोंडीं प्रशंसा करी,
निंदा मात्र तुझी स्व-कार्य सरतां; स्त्रीची न माया खरी !
स्वार्थी सर्वहि दंग; कोणि कधिंही पाही न दुःखा तुझ्या !
प्रेमांधा ! बहुधा असें, म्हणुनियां तूं दूर ठेवी दुज्या !

सर्वस्वावरि पाणि सोडुनि करी जो प्रेम वेडा खरा,
आशेनें मजला मिळेल दुसरा मत्सारखा बावरा,
त्याच्या खापर दैव देत पहिल्यापासूनि, हस्तीं सदा,
नैराश्यप्लुत, तें करीं धरुनियां, भोगीतसे आपदा.

*    *    *

आहे एकचि या जगीं तव खरें, त्वत्पाप वा पुण्य जें,
त्याचें, रे, फल सोडिना तुज कदा; कांहीं तुझें ना दुजें !

# अलभेस

( वृत्त : शार्दूलविक्रीडित )

ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान

श्रीतुकाराम.

लग्नें सुदृढ गांठ बांधुनि जरी चित्तीं सुखी मानिलें
प्रारंभीं असतें, चुकूनि मज मी; सिद्धार्थही लेखिलें
मातें मी असतें, तरी विधिवशात् संबंध अंतीं मला
होई दुःस्सह ! काय तो भरंवसा ? आहे तसाची भला !

किंवा होइ तुझा स्वभाव चिडका, वा संशयी, मत्सरी,
आज्ञेचें अवमान, नित्य अपमान् होई ! जळे अंतरीं
मी रात्रंदिन ! काय तो भरंवसा ? आहे तसेंची बरें !
माझें सौख्य दिल्या करीं, करिसि तूं, त्याचेंच कीं खोबरें !

किंवा मी बदलेन; दुष्ट अथवा होईन ही घातकी,
दुर्लक्षी, व्यसनी, कुटाळ, अथवा दुःसंशयी, पातकी;
चित्ताचा तरि काय, गे, भरंवसा ? सद्बुद्धिही नश्वर !
राहूं प्रेमिं असो जशीं, अलग ही, ठेवो तशीं ईश्वर !

* * *

तूं माझी नसलीस, गे, तरि मला कांहीं उणें ना, सये !
दैवाचें करणें सुबोध जरि ना, त्या बोल ठेवूं नये ! !

---

# कर्म–फल

( वृत्त–पृथ्वी ).

जिचा भ्रुकुटिचाप, हो, मृतजनासही हांसवी;
त्रिवेणि, गळफांस कीं; मज झुलावुनी नाचवी;
जिचे मृदु–कटाक्ष हे गमत कीं सुरी नागवी,
स्वरूप नच दावुनी, मज वृथा लळा भासवी.

जिचे प्रकट ओष्ठही; दृढ कराल दाढा जिच्या;
सुतीक्ष्ण दशनांतुनी क्वचित घांस जाई तिच्या;
कपालिं उभवी जटा, मजसि आस्वली भासते;
अतीविकट कर्कशा, मज कशी बळें ग्रासते.

मनासि भिववावया भडक लाल ही नेसली;
बघूनि मज चोरुनी, प्रलय दृष्टिनें हांसली;
कठोर भयकारिणी, खचित लांव भासे मला;
कुठारमय मूर्तिचा, मम मनीं ठसा लागला.

* * *

असें प्रखर शल्यही हृदयिं या जळूं लागलें;
दयालु प्रभुच्या वरें , जगतिं या मला लाभलें !

( वर प्रेमगीतांत ' स्वर्ग–पुष्प ' ही कविता पहा. पृ. १२ )

---

टीपः—प्रत्येक मनुष्यानें आपल्या आयुष्यांत केलेल्या कु-कर्मांचा विचार केल्यास, त्यांचें फल त्याच्या मागें पाठ धरून असतें, हा प्रत्यय येईल.

# मृत्यूस

( वृत्तः—मदाक्रान्ता )

येई, येई, करकरुनियां दांत, 'आ' वासुनी वा;
येई, येई, पसरुनि भुजा दीर्घ; येई तसा वा !
येई, आणी हृदय चिरण्या, भोंसकायास भाला;
येई ! घेई उचलुनि शिला, फोडण्या या कपाला !

येई, घेई करिं मज, करी छिन्नभिन्न त्वरेनें,
येई, मातें धरुनि, सदया, शांतिधामीं, त्वरें, ने !
माझे बंधू रडतिल अशी, काळजी कां वहासी ?
माझी आई रुदन करि ही व्यर्थ चिंता वहासी ?

नाहीं का, त्वां रुदन कधिंही ऐकिलें ? पाहिला ना
का, रे, तैसा विरह कधिंही ? आज कां तें रुचेना ?
ऐसा कां, रे, घुटमळतसी ? येथ, निःशंक येई !
प्रेमानें मी तुज करितसें आजि आव्हान, येई !

माझा आत्मा धडपडतसे ही कुडी सोडण्याला;
नोहे दुःखीं, तरि मज रुचे ती तुझी प्रेम-माला;
सौख्यशृंगीं बसुनि थकलों ! सौख्य जाई न जातां !
येऊं पाही तव सदनिचें दुःख वा सौख्य आतां !

नोहे चित्तीं किमपिहि स्पृहा, आस वा वासना वा;
नोहे मोहें मम हृदय या भूतलीं गुंतलें वा;
नोहे स्नेहा, मज इह जगीं, खेंचुनी ठेवि ऐसा,
कर्तव्येंही सहज सरती, आलिया त्वन्निवासा !

आहे सारें, सुजन मनिं जें इच्छिती सौख्य, धामीं,
बंधू, स्नेही सुखद; गृहही, वाहनें, तेविं लक्ष्मी;
वस्त्रें, रत्नें! स्थिर-चर तसें; भोगिलें सर्व कांहीं;
पृथ्वीमाजी नच दिसत जें भोगण्या लोभ होई!

पाहूं इच्छीं मरणसमयीं यातना होत किंवा,
येई शांती, तडफडत कीं जीव, होई सुखी वा;
आत्मा राही जखडुनि पुन्हा, मुक्तही होतसे वा,
आहे कांहीं तव सदनिं जें येथ नाहीं असें वा!

तेथें किंवा पितर असती, नाहिंसे जाहले वा,
आहे ज्याची निरलसपणें मी करूं तेथ सेवा;
आहे तेथें फिरुनि इथला लोभ वा दुष्ट हेवा
प्रेमा किंवा, कुटिलहि स्पृहा, दुःख वा, शांतता वा!

जिज्ञासा ही मम हृदयिं, बा! शोधुनी पाहण्याची,
बाही तूतें म्हणुनि, सखया, तृप्ति होई जिवाची!
येई, नेई हंसत मजला, सार्वभौमा, महेशा!
कंठीं घालीं त्वरित मम या आपुल्या प्रेम-पाशा!

# " दिवंगत भार्येस "

( वृत्त–मदाक्रांता )

आहे कोठें हृदयरमणी, मेनका, चारुगात्री,
मुष्टीमाजी, सहज धरि हे प्राण जी सौख्यदात्री,
वेडे, माझे, परि नच कधीं जाच मातें जहाला ?
मुष्टी ना ती, कमलच मृदू, भृंग मी कोंडलेला ! ॥ १

येई, येई त्वरित, नलिनी, मुक्त आकाशमार्गें;
प्रेमें मातें धरुनि हृदयीं, सौख्य देई, शुभांगे !
त्वन्नामाचा जप करित मी, ध्यानमुद्रा धरूनी,
आहे येथें, रुचिरनयने, शालिनी, प्रेमखानी ! ॥ २

स्वप्नीं मातें, सतत दिससी, बोलसी गोड वाचा;
तृप्ती नोहे परि मज तशी, शोष वाढे जिवाचा !
साहूं कैसे अमित दिन हे, अंत नाहीं जयांसी;
आर्ये, भार्ये ! त्यजुनि मजला कासया दूर जासी ? ॥ ३

नाहीं केला चुकुनिहि कदा कोणताही गुन्हा, मी,
राहूं कैसा, अदय जगतीं, कष्ट सोसूनियां मी ?
सान्निध्याची धरुनि हृदयीं, वासना अष्टयामीं,
देवी, राहूं, जळतचि किती तप्त–कुंडांत या, मी ? ४

रागें कां, गे, वदसि मजला शब्द हे बाण जेंवी,
हृत्भेदी हे, "जवळि नच या" ? लोटिसी दूर कैंवी ?
जाऊं कोठें ? तुजविण नसे आसरा या जिवाला !
चोरूनीयां मम हृदय तूं कां मला दीन केला ? ५

प्रेमें पाजी सलिल मजला रौप्यपात्रींच ताजें;
ठेवूं देई, मृदुकुचतटीं शीर्ष हें तप्त माझें;
झोपूं दे, वा, मम शिर सुखें ठेउनीयां त्वदंकीं !
माझी, ना, तूं, मृदुकमलिनी, प्रेमला, कोमलांकी ? ६

जें थोडेंसें, बहु समजुनी, याचिलें, प्रार्थुनी, मी,
तें ना देतां परत मजला धाडिसी कष्टवूनी !
नीराभावीं, तडफड करूं, मीन जैसा, अभागी ?
कान्ते, आतां पुनरपि कदा मी न कांहींच मागीं ! ७

कैसा आतां विसरुनि तुला मी समाधान पावूं ?
कोठें शोधूं तुजसि, सखये, कोठपर्यंत जाऊं ?
कोठें धावूं सुख मिळविण्या, कोठपर्यंत साहूं ?
कोठें येऊं, तुज मिळविण्या, कोठपर्यंत राहूं ? ८

उद्यानीं या रुचिर सुमनें नित्य जाती सुकूनी !
भार्ये ! वाहूं तुजविण कुणा पुष्पमाला अतां मी ?
स्वर्गामाजीं, मजविण, सखे, राहसी का सुखी, तूं ?
राहे तैसी; तुजविषयिं मी अन्य, गे, काय चिन्तूं ? ९

दुष्टा दैवा ! मम हृदयिं कां रोग हा जोडिला, रे ?
जीवाचें हें सुख हिरवुनी, नागवीलें कसें, रे ?
चित्ताला या अमरहि अशी कीड कां लाविली, रे ?
शांता माझी हरण करुनी वेड कां लाविलें, रे ? १०

आधीं मातें वर उचलुनी, शेवटीं पाडिलें कां ?
रत्नांचें हें मखर जडुनी, शेवटीं मोडिलें कां ?
आधीं सौख्यीं रमवुनि मला, शेवटीं ताडिलें कां ?
स्वर्गीं आधीं सुखवुनि, पुढं रौरवीं सोडिलें कां ? ११

शान्ते, कान्ते ! विसरुनि अतां मागलें सौख्य जाऊं ?
आल्या भोगा नयन मिटुनी, भोगण्या सज्ज होऊं ?
प्रार्थी देवा, मज तुजकडे आणण्या सांग, देवी !
राहूं तेथें पुनरपि, सखे ! जोडिनें येथ जेंवी ! ११



# एका कवीची आत्महत्त्या

प्रीतीची जळती ज्योत, त्याकडे ॥
कडकडे । त्यावरी पडे । स्पर्श जों घडे ।
वृक्ष उन्मळला । दुभंगून खालीं पडला । त्या क्षणीं ॥

—गोविंदाग्रज.

कुठल्याशा जागीं देख ।
टेंकडी रम्यशी एक ॥ पसरली ॥
जागजागिं वेली डुलती ।
ताटवे फुलांचे फुलती ॥ रम्यसे ॥
नवयुवती तेथें फिरती ।
दृष्टिक्षेपें त्या हरती ॥ जीवना ॥
कितिएक भृंग कमलांच्या ।
मधुसुखचुंबन करण्याच्या ॥ चिंतनीं ॥
गुंतले । भान विसरले । अंध जाहले ।
शून्य दृष्टीचा । त्यांमधें क्षुब्ध हृदयाचा ॥ एकची ॥१॥

तो शून्य दृष्टिचा पुतळा ।
जो विरहकर्दमीं रुतला ॥ बापुडा ॥
त्या बाह्य जगाचा कांहीं ।
स्मृतिशेष राहिला नाहीं ॥ बावळा ॥
प्रेमाच्या अतिरेकानें ।
पूर्वींच्या गोडस्मृतीनें ॥ ग्रासला ॥
हृदयींच्या ध्येय-स्वप्नीं ।
एकला फिरे गुंतूनी ॥ तो खुळा ॥
बापुडे । कांहिं बडबडे । ना तरी चिडे ।
भग्न आशेचें । भासतें क्रूर दैवाचें ॥ खेळणें ॥ २ ॥

आकाशीं दृष्टि रोखी ।
जणुं प्रियकरिणीसि विलोकी ॥ त्या स्थळीं ॥
निग्रहें ओष्ठ दाबूनी ।
हातांच्या मुष्टी वळुनी ॥ पुटपुटे ॥
मग सर्वेचि बोलत जाई ।
कुठल्याशा एका ठायीं ॥ बैसला ॥:—
" या इथें प्रियतमा, बकुली ॥
" गोकुली, माझि ती छकुली ॥ बैसली ॥
" निग्रहें । वदलि शब्द हे । ' सत्य सत्य हें ।
" तुमाचि मी आहें । जोंवरी प्राण हा राहे ॥ तोंवरी ' ॥३॥

" हर्सित हस्त देउनि, देवी ।
" स्कंधीं या मस्तक ठेवी ॥ प्रियतमा ॥
" निश्चल दृष्टीनें पाही ।
" क्षणएक स्तब्ध ती राही ॥ कोमला ॥
" आशि भाक निश्चयें केली ।
" ऐकुनी हांसती वेली ॥ कुतुहलें ॥
" मग स्नेहश्रीनें हंसले ।
" प्रेमाश्रूंनीं डबडबले ॥ नेत्र ते ॥
" राजसे । तें तुझे हंसें । ह्या हृदीं ठसे ।
" रेखिलें जैसें । कुसुमलेखणीनें तैसें ॥ राहिलें ॥ ४ ॥

" परि अतां दूर ती गेली ।
" ताटातुट माझी केली ॥ कां प्रभो ? ॥
" आकाशीं रवि मावळला ।
" अंधार हृदयिं बोकळला ॥ घोर हा ॥
" जरि नभीं स्मृतींचा चांद ।
" स्वप्रभें देइ आनंद ॥ थोडका ॥
" तरि दुःसह विरहाग्नीचा ।
" मनिं ताप भयंकर साचा ॥ होतसे ॥

" वळवळे। प्राण तळमळे। झोंप ही पळे।
" जीव जाईना। शांतताहि मुळिं येईना ॥ मन्मनीं "॥५॥

मग प्रियाराधना केली।
मिटुनि नेत्र, तों ती आली ॥ सोज्वला ॥
आरक्त गाल लज्जेनें।
आसक्त नेत्र प्रेमानें ॥ मधुरिका ॥
स्फुरित ओष्ठ उत्कंठेनें।
त्वरितगामि हृत्पंखानें ॥ पातली ॥
बाहूंची करुनी माला।
आदरें वाहिली त्याला ॥ सत्वर ॥
घसरला। भान विसरला। ठायिं पसरला।
निचेष्टित झाला। आनंदसागरीं बुडला ॥ बापुडा ॥ ६ ॥

खडबडून जागा होई।
निजसखिला शोधुनि पाही ॥ नाहिं ती ॥
" हाय! दिव्य सौदामीनी।
" मजासि जासि कां टाकूनी ॥ तूं पुन्हा ॥
" तुजविना कसा मी राहूं।
" विरहदुःख कैसें साहूं ॥ तारके ॥
" सोनुले, पुनरपी येई।.........
" ना तरी तुझ्या भेटीं मी ॥ येतसें "! ॥
बोलुनी। वक्ष खोलुनी। जोर तोलुनि!
सुरी तो मारी। विरहदुःख तें परिहारी ॥ शेवटीं!!। ७॥

---

**टीपः**—या कवितांतील कवीची 'प्रियतमा' कोण? असा प्रश्न वाचक सहज करतील. ही कवीची प्रियतमा कोणी स्त्री नसून 'स्फूर्ति' या स्त्रीलिंगी शब्दानें उल्लेखिल्या जाणाऱ्या मोहक शक्तीला स्त्रीरूपानें कवीनें संबोधिलें आहे! स्फूर्तिनष्ट कवीला आत्महत्त्येशिवाय मार्ग कोणता?



कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।

गीता २.४७

# परिशिष्ट

| | कविता | टोंपण नांव | लिहिल्याची तारीख | अंक | मासिक |
|---|---|---|---|---|---|
| १ | वाचकांस | भालेन्दु | १३ मार्च १९३८ | एप्रिल १९३८ | ज्योत्स्ना |
| २ | एक कवि कवि कसा झाला | सिद्धार्थ / शान्ता-राम | २१ नोव्हेंबर १९३३ | नोव्हेंबर १९३३ | प्रभु-प्रभात / नवजीवन |
| ३ | श्रम आणि फळ | भालेन्दु | २९ आगस्ट १९३१ | जानेवारी १९३२ | नवजीवन |
| ४ | प्रेम आणि मरण | रमेश | १३ एप्रिल १९३० | सप्टेंबर १९३० | मनोरंजन |
| ५ | अलभेस | शान्ता-राम | १६ नोव्हेंबर १९३१ | जानेवारी १९३३ | नवजीवन |
| ६ | शंका-निरसन | राधा-कान्त | २७ आगस्ट १९३० | एप्रिल १९३२ | ” |
| ७ | स्वदेश-सेविका | स्व-देश | १२ जून १९३१ | सप्टेंबर १९३० | मनोरंजन |
| ८ | चित्तचोराचें उत्तर | शान्ता-राम | २३ जून १९३१ | डिसेंबर १९३२ | नवजीवन |
| ९ | स्वर्ग-पुष्प | राधा-माधव | २९ आक्टोबर १९२९ | मार्च १९३० | यशवंत |
| १० | दृढ-बंधन | भालेन्दु | ८ जुलै १९३३ | आक्टोबर १९३३ | प्रभु-प्रभात |
| ११ | स्वर्गीय प्रेम | | २३ सप्टेंबर १९३० | अप्रसिद्ध | |
| १२ | मधुर-हास्य | भालेन्दु | १३ आगस्ट १९३० | जुलै १९३१ | यशवंत |
| १३ | कविता कशास ? (१) | ,, | ९ सप्टेंबर १९३० | नोव्हेंबर १९३० | नवजीवन |
| १४ | फक्त प्रेमाची ओंवाळणी | ,, | २० जून १९३३ | जुलै १९३३ | ” |
| १५ | नूतन वर्षारंभ | ,, | १ जानेवारी १९३२ | जानेवारी १९३३ | ” |
| १६ | काय म्हणूं ? | ,, | ३ नोव्हेंबर १९३३ | नोव्हेंबर १९३३ | कलादर्श |
| १७ | श्रम-निरसन | रमेश | १५ जुलै १९३० | एप्रिल १९३१ | मनोरंजन |
| १८ | भग्नहृदयांतील करुणोद्गार ऐकून | भालेन्दु | १४ जून १९३१ | सप्टेंबर १९३२ | नवजीवन |

| | कविता | टोंपण नांव | लिहिल्याची तारीख | अंक | मासिक |
|---|---|---|---|---|---|
| १९ | विरह-वेदना | भालेन्दु | २८ डिसेंबर १९३० | जानेवारी १९३१ | मनोरंजन |
| २० | अभाग्याचें प्रतिमापूजन | ,, | १८ मे १९३२ | आक्टोबर १९३२ | नवजीवन |
| २१ | मी आहेंच तुझा | ,, | २२ मे १९३४ | जून १९३४ | कलादर्श |
| २२ | मी नाहीं तुमची | ,, | १२ जून १९३४ | जून १९३४ | मनोरंजन |
| २३ | प्रेम-मन्दिर | ,, | १३ मे १९३२ | जुलै १९३२ | नवजीवन |
| २४ | दोन पक्षी | ,, | ३० जून १९३१ | जानेवारी १९३२ | मनोरंजन |
| २५ | प्रतिबन्ध | राधा-माधव | २९ जून १९३१ | जानेवारी १९३१ | ,, |
| २६ | सवति-मत्सर | शान्ता-राम | ७ जून १९३३ | जुलै १९३३ | नवजीवन |
| २७ | कविता कशास? (२) | भालेन्दु | २९ एप्रिल १९३३ | जून १९३३ | ,, |
| २८ | प्रेम-कलह | ,, | २६ आगस्ट १९३० | मार्च १९३५ | ,, |
| २९ | निष्कलंक | ,, | २१ मे १९३२ | आगस्ट १९३२ | ,, |
| | | राधा-माधव | २० आक्टोबर १९२९ | नोव्हेंबर १९३१ | मनोरंजन |
| ३० | वंचना | भालेन्दु | १५ नोव्हेंबर १९३२ | जानेवारी १९३४ | ,, |
| | | ,, | | डिसेंबर १९३३ | वाङ्मय |
| ३१ | तूं टाकलेंस तर | राधा-माधव | २० मे १९३२ | नोव्हेंबर १९३२ | नवजीवन |
| ३२ | सुलतेस | भालेन्दु | १५ जून १९३१ | आगस्ट १९३१ | मनोरंजन |
| ३३ | तेव्हां आणि आतां | ,, | ३ जून १९३२ | सप्टेंबर १९३२ | वाङ्मय |
| ३४ | अनास्था | शान्ता-राम | १३ आगस्ट १९३२ | फेब्रुवारी १९३४ | कलादर्श |
| ३५ | बन्धनाच्या अलिकडे | ,, | २१ सप्टेंबर १९३३ | नोव्हेंबर १९३३<br>डिसेंबर १९३३ | वाङ्मय<br>नवजीवन |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ३६ | प्रेम आणि कर्तव्य* | शान्ता-राम | १३ आक्टोबर १९३३ | आक्टोबर १९३३ | नवजीवन |
| ३७ | सागरिकेस | राधा-माधव | २२ फेब्रुवारी १९३० | फेब्रुवारी १९३१ | मनोरंजन |
| ३८ | अटकेंत | राधा-कान्त | १३ एप्रिल १९३३ | नोव्हेंबर १९३३ | नवजीवन |
| ३९ | सुकलेलें सोनचाफ्याचें फूल | भालेन्दु | १७ आक्टोबर १९३६ | नोव्हेंबर १९३६ | कलादर्श |
| ४० | अधम-संगम | ,, | १७ जानेवारी १९३२ | नोव्हेंबर १९३२ | नवजीवन |
| ४१ | परित्यक्त | शांतानाथ | १८ सप्टेंबर १९३० | आक्टोबर १९३० | मनोरंजन |
| ४२ | शृंखला | राधा-माधव | २५ आगस्ट १९३० | डिसेंबर १९३० | यशवंत |
| ४३ | त्याग | भालेन्दु | ५ आगस्ट १९३४ | | नवजीवन |
| ४४ | दैवाचा पराजय | ,, | ६ एप्रिल १९३४ | एप्रिल १९३४ | कलादर्श |
| ४५ | अखेरचें पूजन | शांता-राम | २८ मे १९३३ | जून १९३३ | नवजीवन |
| ४६ | मृत्यूस | राधा-कान्त | १६ सप्टेंबर १९३० | नोव्हेंबर १९३० | मनोरंजन |
| ४७ | निराशा | भालेन्दु | २३ मे १९३१ | ११ वा अंक | वागीश्वरी |
| ४८ | स्वप्नांतील संसार | ,, | २० डिसेंबर १९३१ | मार्च १९३३ | नवजीवन |
| ४९ | चांदणी | ,, | १२ जुलै १९३३ | आगस्ट १९३३ | प्रभु-प्रभात |
| ५० | स्त्री | ,, | १५ फेब्रुवारी १९३३ | फेब्रुवारी १९३३ | नवजीवन |
| ५१ | सुवर्ण | ,,<br>,, | १९ मे १९३४ | आगस्ट १९३४<br>जून १९३४ | कलादर्श<br>सुवर्ण |
| ५२ | प्राणेश्वरी ! वैरिणी ! ! | ,, | ७ एप्रिल १९३४ | मे १९३४ | वाङ्मय |
| ५३ | भिकारी | ,, | १२ सप्टेंबर १९३३ | आक्टोबर १९३३ | कलादर्श |
| ५४ | निराशा-डोह | शान्ता-राम | १२ जुलै १९३३ | आगस्ट १९३३ | ,, |
| ५५ | धडपड व्यर्थचि ही ! | रमेश | ३ आगस्ट १९३० | आगस्ट १९३० | मनोरंजन |

* ही कविता तेथें " कशि या त्यजूं पदाला " या मथळ्याखालीं छापली आहे.

| | कविता | टोंपण नांव | लिहिल्याची तारीख | अंक | मासिक |
|---|---|---|---|---|---|
| ५६ | निराश-प्रेम | शान्ता-माधव | २२ फेब्रुवारी १९३३ | एप्रिल १९३३ | नवजीवन |
| ५७ | प्रेम-संन्यास | शान्ता-राम | १२ सप्टेंबर १९३२ | मार्च १९३३ | ,, |
| ५८ | होऊं बालक मी तुझें ? | राधा-कान्त | १४ जुलै १९३२ | आक्टोबर १९३३ | ,, |
| ५९ | देवाकडे भांडण | भालेन्दु | ५ मार्च १९३४ | मार्च १९३४ | कलादर्श |
| ६० | मातेस | ,, | ७ मे १९३४ | मे १९३४ | मनोरंजन |
| ६१ | आतां पुन्हा येइ का ? | ,, | १९ सप्टेंबर १९३० | मे १९३२ | नवजीवन |
| ६२ | उषा-लोप | ,, | २० आक्टोबर १९३३ | नोव्हेंबर १९३३ | वाङ्मय |
| ६३ | शोक-पर्यवसान | ,, | २७ डिसेंबर १९३० | आगस्ट १९३४ | सुवर्ण |
| ६४ | मूले कुठारः | ,, | ६ एप्रिल १९३४ | एप्रिल १९३४ | नवजीवन |
| ६५ | विनत पतिता दाखवि दिवा ! | शान्ता-राम | १२ एप्रिल १९३३ | जानेवारी १९३४ | ,, |
| ६६ | विजय | भालेन्दु | २७ आक्टोबर १९३२ | आगस्ट १९३४ | ,, |
| ६७ | आत्मसंयमन | ,, | ५ जुलै १९३० | मार्च १९३२ | ,, |
| ६८ | नश्वरता | सुभाषित | १० सप्टेंबर १९२९ | मार्च १९३० | मनोरंजन |
| ६९ | स्वार्थ | भालेन्दु | १२ आक्टोबर १९३२ | नोव्हेंबर १९३७ | नवजीवन |
| ७० | माझें | ,, | २० डिसेंबर १९३२ | डिसेंबर १९३२ | ,, |
| ७१ | अलभेस ( २ ) | दिगंबर | १८ फेब्रुवारी १९३३ | फेब्रुवारी १९३३ | ,, |
| ७२ | कर्म-फल | राधा-माधव | ३१ आक्टोबर १९२९ | सप्टेंबर १९३२ | यशवंत |
| ७३ | मृत्यूस | भालेन्दु | २० आक्टोबर १९३२ | फेब्रुवारी १९३४ | नवजीवन |
| ७४ | दिवंगत भार्येस | ,, | ११ मे १९३१ | एप्रिल १९३३ | ,, |
| ७५ | एका कवीची आत्महत्या | राधा-माधव | १३ मे १९३० | डिसेंबर १९३० | मनोरंजन |

# सूचिपत्र


| कविता | पृष्ठ |
|---|---|
| **अ** | |
| अखेरचें पूजन ... ... | ६२ |
| अटकेंत ... ... ... | ५३ |
| अधम-सङ्गम ... ... ... | ५५ |
| अनास्था ... ... ... | ४८ |
| अभाग्याचें प्रतिमापूजन ... | २८ |
| अलभेस ... ... ... | ७ |
| अलभेस ( २ ) ... ... | ९८ |
| **आ** | |
| आतां पुन्हा येइ का? ... | ८४ |
| आत्मसंयमन ... ... ... | ९४ |
| **उ** | |
| उषा-लोप ... ... ... | ८६ |
| **ए** | |
| एक कवि कवि कसा झाला ... | २ |
| एका कवीची आत्महत्या ... | १०५ |
| **क** | |
| कर्म-फल ... ... ... | ९९ |
| कविता कशास? ... ... | १८ |
| कविता कशास? ( २ ) ... | ३५ |
| काय म्हणूं? ... ... ... | २३ |
| **च** | |
| चांदणी ... ... ... | ७१ |
| चित्तचोर ... ... ... | १० |
| चित्तचोराचें उत्तर ... ... | ११ |

| कविता | पृष्ठ |
|---|---|
| **त** | |
| तूं टाकलेंस तर ... ... | ४३ |
| तेव्हां आणि आतां ... ... | ४६ |
| त्याग ... ... ... | ६० |
| **द** | |
| दिवंगत भार्येस ... ... | १०२ |
| दृढ-बंधन ... ... ... | १३ |
| देवाकडे भांडण ... ... | ८२ |
| दैवाचा पराजय ... ... | ६१ |
| दोन पक्षी ... ... ... | ३२ |
| **ध** | |
| धडपड व्यर्थचि ही ... ... | ७८ |
| **न** | |
| नश्वरता ... ... ... | ९५ |
| निराश प्रेम ... ... ... | ७९ |
| निराशा ... ... ... | ६७ |
| निराशा डोह ... ... ... | ७६ |
| निष्कलंक ... ... ... | ४० |
| नूतन वर्षारम्भ ... ... | २२ |
| **प** | |
| परित्यक्त ... ... ... | ५७ |
| प्रतिबन्ध ... ... ... | ३३ |
| प्राणेश्वरी! वैरिणी!!... ... | ७४ |
| प्रेम आणि कर्तव्य ... ... | ५१ |
| प्रेम आणि मरण ... ... | ६ |

| कविता | पृष्ठ |
|---|---|
| प्रेम–कलह ... ... ... | ३८ |
| प्रेम–मंदीर ... ... ... | ३१ |
| प्रेम–संन्यास ... ... ... | ८० |
| **फ** | |
| फक्त प्रेमाची ओंवाळणी ... | २० |
| **ब** | |
| बंधनाच्या अलिकडे ... | ४९ |
| **भ** | |
| भग्नहृदयांतील करुणोद्गार ऐकून | २६ |
| भ्रम–निरसन ... ... ... | २४ |
| भिकारी ... ... ... | ७५ |
| **म** | |
| मधुर–हास्य ... ... ... | १६ |
| माझें ... ... ... | ९७ |
| मातेस ... ... | ८३ |
| मी आहेच तुझा ! ... ... | २९ |
| मी नाही तुमची ? ... ... | ३० |
| मृत्यूस ... ... ... | ६३ |
| मृत्यूस ( २ ) . ... | १०० |
| मूले कुठारः ... ... ... | ९१ |
| **व** | |
| वाचकांस ... ... ... | १ |
| वंचना ... ... ... | ४१ |
| विजय ... ... ... | ९३ |
| विनत पतिता दाखवि दिवा ... | ९२ |
| विरह–वेदना ... ... | २७ |
| **श** | |
| शंका–निरसन ... ... | ८ |
| शृङ्खला ... ... ... | ५९ |
| शोक–पर्यवसान ... ... | ८७ |
| श्रम आणि फळ ... ... | ५ |
| **स** | |
| सवति–मत्सर ... ... | ३४ |
| सागरिकेस ... ... ... | ५२ |
| सुकलेलें सोनचाफ्याचें फूल ... | ५४ |
| सुलतेस ... ... ... | ४४ |
| सुवर्ण ... ... ... | ७३ |
| स्त्री ... ... ... ... | ७२ |
| स्वदेश–सेविका ... ... | ९ |
| स्वप्नांतील संसार ... ... | ६९ |
| स्वर्ग–पुष्प ... ... ... | १२ |
| स्वर्गीय प्रेम ... ... ... | १४ |
| स्वार्थ ... ... ... | ९६ |
| **ह** | |
| होऊं बाळक मी तुझें ? ... | ८१ |